# शैशवदूत

ललित निबंध

देवीदास बागूल

सरस्वती प्रकाशन : पुणें २

मूल्य दोन रुपये

मला समजून घेणारे

प्रिय राजा कर्डिले

यांस —

## शै श व दू त

---

# सुस्वागतम् नवागतम् !

श्री. देवीदास बागूल यांच्या ललित-निबंधांचा हा सुन्दर संग्रह म्हणजे मराठी ललित साहित्याच्या प्रांगणांतील त्यांचं पहिलं पाऊल. अंतरंगाचं खरंखुर उत्कट सौहार्द आणि त्यामुळेंच लाभलेली सहज-सुन्दर व रसाळ शब्दकळा, या दोन्ही गुणविशेषांमुळें त्यांचे हे भावपूर्ण ललितनिबंध प्रथम साधनेंत वाचले, तेव्हांच त्यांचं वेगळेपण मनांत भरलं होतं. " बागूलांचा साधनेंतील लेख वाचलात का ?" असं त्या वेळीं मीं अनेकांना आवर्जून विचारलं होतं आणि या नवागताची विचारपूस केली होती, असं आजहि आठवतं. आज त्यांचा हा पहिला-वहिला संग्रह रसिकांपुढें येतांना, त्याची वाटचाल अधिक सुकर व्हावी यासाठीं वडिलकीच्या नात्यानें त्यांना आशीर्वाद देण्याचं आणि त्यांचं मनापासून सहर्ष स्वागत करण्याचं काम माझ्याकडे आलं आहे—आणि मी तें अत्यंत मनःपूर्वक करतों.

गेल्या कांहीं दशकांमध्यें मराठी साहित्य सर्वांगानं विकसित झालं असलं तरी मराठी ललितनिबंध ही चीज मात्र कांहींशी उपेक्षणीय ठरली होती. गंभीर प्रकृतीचा वैचारिक निबंध हें या वाङ्मयप्रकाराचं सनातन स्वरूप असलं, तरी त्याची दुसरी खेळकर, लालित्यपूर्ण

बाजू मराठी साहित्यांत पुरेशी स्थिरावूं शकली नाहीं, असं गेल्या कांहीं वर्षांमध्यें वाटूं लागलं होतं. व्यक्तिमत्वाचा रसरशीतपणा, तीव्र संवेदनाक्षमता, जीवनांतील प्रत्येक अनुभूति उत्कटपणें घेण्याची मनोवृत्ति आणि या साऱ्यांला शब्दांकित करणारी नाजूक शब्दकळा या सर्व गोष्टी खऱ्याखुऱ्या ललितनिबंधकाराला अत्यावश्यक असल्यानेंच कदाचित् या क्षेत्रामध्यें पुरेसं समाधानकारक लिखाण होत नसावं. विनोबांचे लेख जसे याला अपवाद, तसेच विन्दा करन्दीकरां-सारख्या अस्सल कवीनें 'स्पर्शाच्या पालवी'मध्यें अन्तर्भूत केलेले, दुर्गा भागवतांचे 'ऋतुचक्रां'तील किंवा नानासाहेब गोऱ्यांचे 'डालीं'तील काव्यमय ललितलेखहि अपवादभूत होत. श्री. देवीदास बागूल यांचे या संग्रहांत आलेले कांहीं लेख या निकषावर निःसंशय उतरतात यांत शंका नाहीं.

या संग्रहांतील पहिले एक-दोन लेख वाचीत असतांना मूर्तिमंत काव्य इथं चुकून गद्यांत अवतरलं आहे, असं वाटण्याइतकी काव्यात्मता आणि उत्कट समरसता प्रत्ययास येते. निसर्गाच्या सान्निध्यांत आणि सन्तांच्या स्मृतींत बागूलांची प्रतिभा जशी बहरते आणि रंगते, तितकी ती इतरत्र क्वचितच रंगते. 'अहल्योद्धार' या पहिल्याच काव्यमय आणि भावपूर्ण लेखामध्यें, वर्षाऋतूमध्यें नयन-सुख आणि स्पर्शसुख देणाऱ्या निसर्गाच्या विविध बारकाव्यांचं आणि विभ्रमांचं जें अत्यंत मनोज्ञ चित्रण त्यांनीं केलं आहे तें खरोखरच अविस्मरणीय वाटतं. पंचेंद्रियांच्या साहाय्यानें न्याहाळलेला, स्पर्शिलेला, आस्वादिलेला निसर्ग त्यांनीं इथें रसिकांपुढें अत्यंत हळुवार हातानें साकार केला आहे. या तन्मयतेमध्यें 'रंगांच्या दुनियेंतील तो एक स्वप्न-प्रवास होता' यांसारखीं काव्यमय सूत्रवाक्यें ते नकळत लिहून जातात आणि त्यांचा विसर वाचकांना सहजासहजीं पडत नाहीं.

निसर्गाइतकीच तद्रूपता बागूलांनीं आपल्या आवडत्या संतांच्या वाङ्मयीन स्मृतींमध्यें अनुभवली आहे, याचं प्रत्यंतरहि इथं पानोपानीं मिळतं. ‘ ज्ञानेश्वरांची मित्रकल्पना ’ हा या संग्रहांतील लेख त्यांच्या सन्तवाङ्मयाच्या परिशीलनाचा जशी साक्ष देतो, तशीच या अलौकिक संतामधील, लौकिकांत आढळणारा भावनेचा झराहि त्यांनीं पाहिला असल्याची खूण पटवितो. ‘ बोलायचें कुणाशीं ? ’ या या संग्रहांतील दुसऱ्या सुन्दर लेखामध्यें ज्ञानेश्वरांच्या ज्या अवीट गोडीच्या ओवीचा उल्लेख त्यांनीं सहजगत्या केला आहे, ती कोणत्याहि रसिकाला एक मधुर हुरहूर लावील यांत शंका नाहीं.

या लेखाप्रमाणेंच या संग्रहांतील इतर कांहीं लेखांमध्यें बागूलांच्या हळव्या, उत्कट, संवेदनाक्षम व्यक्तिमत्वाची चाहूल जागोजागीं लागते. स्वतःबद्दल प्रत्यक्षपणें न लिहितांनाहि स्वतःच्या व्यक्तिमत्वाचे अनेकविध नाजुक तरंग लेखनांत उमटविणें——सहजगत्या उमटविणें— हें सच्च्या कलाकारालाच साधतें. तें बागूलांना मोठ्या प्रमाणात साधलें आहे. संतवाणीमध्यें त्यांची शब्दकळा सुस्नात झाल्यानें, तिच्यावर एक आगळेंच मांगल्य चढलें आहे. ‘ लावण्यमयी ’ हें विशेषण ते नकळत कल्पनेला लावून जातात आणि एक साकार रेखीव मूर्ति आपल्या मनश्चक्षूंसमोर उमटून जाते. अतरींचें सौहार्द आणि रसाळ शब्दकळा या दोन्ही गुणांचें सान्निध्य लाभल्यानें बागूलांच्या अनेक लेखांना एक आन्तरिक गोडवा लाभला आहे. मी त्यांचं मनःपूर्वक स्वागत करतों.

——वि. द. घाटे

# अहल्योद्धार

मन कितीहि कष्टी आणि विषण्ण असलें तरी परिसाच्या स्पर्शानें लोखंडाचे निमिषांत सुवर्ण व्हावे तद्वत निसर्गदर्शनानें मनावरील विषण्णतेचा गंज झडून जातो आणि तनामनावर आनंदरसाची सुवर्णकळा चढते. मनांतली प्रसन्नता चेहऱ्यावर उमलून येते. नेत्र उत्फुल्ल होतात. अधर स्मिताच्या प्रेरणेने विलग होतात.

ह्या निसर्गदर्शनाचेहि अनेक अवतार आहेत. मात्र पंचेंद्रियांपैकीं प्रत्येकाला आवाहन करण्याचे सामर्थ्य निसर्गाच्या सहा अवतारांमध्ये फक्त वर्षा-अवतारांतच आहे, असें मला वाटतें. तसें पाहिले तर प्रत्येक ऋतूचे कांहींतरी व्यवच्छेदक लक्षण असतेंच ! त्या व्यवच्छेदक लक्षणाच्या गौरवांत त्या त्या कालांत प्रत्येक ऋतूला 'कहाणीच्या चाली' वर श्रेष्ठ ठरविले जातें. अगदीं रुक्ष असणाऱ्या ग्रीष्माचेसुद्धां 'ग्रीष्म माझिया दारीं आला, ग्रीष्म माझिया दारीं' असें स्वागतगीत आळविलें जातें.

मात्र वर्षाऋतूशिवाय इतर ऋतु पंचेद्रियांपैकीं कोणत्या तरी एकाच इंद्रियाला सौंदर्यविश्वाच्या एकेका पैलूचें दर्शन घडवितात. शरदांतील रूपसौंदर्याचा सोहळा, हेमंतांतील स्पर्शसुखाची अनुभूति, वसंतांतील परिमलाचा आल्हाद इत्यादि पृथक् पृथक् सौंदर्यदर्शनानें त्या त्या इंद्रियद्वारां मनाची सौंदर्यतृष्णा कांहीं अंशींच तृप्त होते. परंतु वर्षाऋतु मात्र एकटाच सर्व इंद्रियांचे एकसमयावच्छेदेकरून समाधान करतो. वर्षाऋतूंतील निसर्गदर्शनाने डोळ्याला रूपाची खाणी उघडलेली दिसते. कर्णाला नादब्रह्माची चाहूल ऐकूं येते. त्वचेला स्पर्शसुखाची भेट होते आणि घ्राणेंद्रियाला परिमलाचा वेध लागतो. रसनेला नवीच गोडी लाभते. सगळ्या पंचेद्रियांतच प्राणतत्त्व उमलते.

परवां जेव्हां चाळीसगांव स्टेशनवरून वर्षाकालीन पहिला-वहिला सूर्योदय पाहिला, तेव्हां ग्रीष्मानें शुष्क झालेलीं इंद्रियें पुन्हां रसरसून हिरवीं झालीं. प्रेमळ व्यक्तीच्या सहवासांत संकोच गळून पडावा त्याप्रमाणे 'आंतील विषण्ण वृत्ति' गळून पडल्या. पूर्वेकडील क्षितिजा-लगत प्रकाशब्रह्माचा आत्माविष्कार होत होता. त्या आत्माविष्कारांत नवथर जलार्द्र मेघ न्हाऊन निघाले. ते अरुणकालीन प्रकाशफूलहि निळसर जलदांच्या सहवासांत खुदकन् हंसले. त्या हास्यांत त्या प्रकाश-फुलाचें सप्तरंगी अंतरंग प्रगट झाले. त्याचे पडसाद मेघांच्या मुखावरहि उमटले. आणि अंतरिक्षांत सप्तवर्णांचें एक संवादी संमेलनच भरलें.

तें रंग-संमेलन किती विभ्रमशील होते ! प्रिय व्यक्तीशीं संभाषण करतांना तरल मुखावरील भाव क्षणाक्षणाला बदलावेत, त्याप्रमाणें अनेकविध मेघाकृतींवरील रंगछटांत बदल होत होते. आणि त्या

रंगछटाहि अशा अलगद बदलत होत्या कीं, रंगाची एक छटा संपली केव्हां आणि दुसरी सुरू झाली केव्हां ह्याचें भानहि उरूं नये. रंगांच्या दुनियेंतील तो एक स्वप्न-प्रवास होता !

आकाशांत इंद्रधनूचे रंग सांडले होते, तर भूमीवर हरित तृणाचे दशावतार विलसत होते. शेतांच्या मध्यभागीं कोंवळ्या गवतांचा पिंवळसर हिरवा, शेतबांधावरील तृणाचा निळसर हिरवा, प्रौढ तृणाचा निव्वळ हिरवा, कटिशिखांत पल्लवित झालेल्या वृक्षांचा काळसर हिरवा; अशा कितीतरी हिरव्या कळा रसरसून आल्या होत्या. तशांतच मेघांच्या करसंपुटांतून स्रवणारें ऊन त्या हिरवळीवर पडल्यानें त्या हिरव्या कळांना विलक्षण तजेला आला होता. जणूं कांहीं त्या हिरवळीच्या रूपानें भूमीचें ‘ मेणाहुनी मऊ ’ असलेलें संत-अंतरंगच प्रकट झालें होतें ! ग्रीष्म ऋतूंत हीच धरा किती रुक्ष आणि भकास वाटत होती ! ठायीं ठायीं पडलेल्या भेगांनीं तिच्यावर वृद्धत्वाची अवकळा चढली होती. परंतप ग्रीष्मानें तिच्यांतला सगळा रसच शोषून घेतला असल्याकारणानें तिच्या ठायीं मार्दवाचा कधीं पुन:संभव होईल कीं नाहीं, ह्याची कल्पनाहि करवत नव्हती. परंतु तरीहि ती धरा—धारण करणारी—असल्यानें वर्षाऋतूचा पदस्पर्श होतांच तिचा ‘ अहल्योद्धार ’ होतो आणि ‘ का भूमीचें मार्दव । सांगे कोंभाची लवलव । ’ ह्या ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणें तिच्यांतली सारी मृदुता हिरवळीच्या रूपानें बाहेर प्रकटते. ऋताचा पुन्हां एकदां प्रत्यय येतो.

ह्या हिरवळीचें सौंदर्य जितकें दर्शनांत आहे, तितकेंच तें तिच्या स्पर्शांतहि आहे. ‘ हिरवेंगार ’ हा सामासिक शब्द त्या

अविभाज्य संवेदनांचें प्रतीक आहे. ' गार ' ह्या संज्ञेनें स्पर्शेंद्रियाला सांद घातली जाते. आणि त्या मृदुल तृणाला स्पर्श करतांच त्वचेवर रोमांच उठतात. ' मातीच्या पुत्राचें ' मातीशीं नातें जोडलें जातें. हरित तृणाच्या कुशींत अंग झोंकून दिलें म्हणजे, अपार स्पर्शसुख होतें. खरें म्हणजे ह्या वर्षाऋतूंत स्पर्शसौंदर्याची एक इंद्रभुवनगुहाच उघडली जाते. पारिजातकाचीं फुलें, जाईचीं फुलें ह्यांच्या सुगंधा-बरोबरच त्यांच्या स्पर्शाचा अनुभव घेतला नाहीं, तर त्यांपासून होणाऱ्या आनंदाला पूर्णताच येऊं शकत नाहीं. याहिपेक्षां आकाशाच्या विशाल अंतःकरणातून स्रवणाऱ्या त्या अमित जीवनधारांनीं माझ्या अंगाला कुरवाळलें म्हणजे, माझा देहच स्पर्शाचें एक सुंदर टपोरें फूल बनतो.

वर्षाऋतूंत अनेक सुगंधी फुलें उमलत असलीं तरीहि वर्षाऋतूला सुगंधाच्या बाबतींत मी जें राजपद बहाल करतों तें केवळ रात-राणीमुळें. सुगंधी फुलें म्हटलीं म्हणजे वासंतिक मोगरा, शारदीय गुलाब, वर्षाकालीन पारिजात, जाई, चांफा ह्यांचीं नावेंच प्राथम्यानें घ्राणेंद्रियाला सामान्यतः स्मरतात. कारण, तीं सर्व सुबोध आहेत. त्यांच्या सुगंधाबरोबर त्यांचा पार्थिव आकारहि चर्मचक्षूंना भासमान होतो. त्यांची सौरभप्रतीति तीं फुलें पार्थिव आकारानें आपल्या करपल्लवांत आल्याशिवाय होत नाहीं. परंतु योजनगंधा रातराणीचा सौरभ मात्र अरूपाचे पंख लेवून माझ्यापर्यंत दरवळत येतो.

दिवसभराच्या धबडग्याने आपण शिजून निघालेले असतों. त्या गोंधळांत वृत्तीची संवेदनक्षमता देशोधडीला लागते. आणि सांजकाळीं पाहावें तों मन कुठेंतरी कोपऱ्यांत संकोचून बसलेलें

दिसतें. आंबलेल्या शरिरानें पोटांत 'चार घांस' ढकलले म्हणजे अवयव सुस्तावतात, परंतु मन अस्वस्थच असतें. तोंच बाहेरून पावसाळी गारवा साद घालतो आणि मनांतील मुशाफिर जागा होतो. न कळत पाय घराबाहेर पडतात.

नुकताच पाऊस पडून गेलेला असतो. विजेरी प्रकाशाच्या प्रदेशांतील निथळणारी धरित्री ओलेल्या स्त्रीप्रमाणे मंथर झालेली असते. तिचे धुळीचें वस्त्र तिच्या अंगाला कसे चापचोपून आणि चिंब होऊन चिकटलेले असतें! श्वासांत गारवा असतो. पण नुसताच गारवा नसतो, तर त्या गार श्वासांतून एका तरल सुगंधाची माया भरलेली असते. कोठून येतो तो सुगंध? खरें म्हणजे, त्या क्षणीं मुळीं हा भौगोलिक प्रश्न मनांत उद्भवतच नाहीं. उद्भव होतो तो फक्त आर्त ओढीचा! त्या सुगंधानें मनांतली अपार्थिवतेची ओढ चाळविली जाते. अंतर्मुख मन कसले तरी गूढशोधन करूं लागतें. हळूं हळूं सगळें स्थिरचरच सुगंधमय वाटूं लागते. दशदिशांतून साद घालीत प्रत्येकाला आलिंगन देणाऱ्या त्या दिगंबर सुगंधामुळें—

**तों मज गमलें विभूति माझी।**
**स्फुरत पसरली विश्वामाजीं ॥**

ह्या अनुभूतीचा प्रकाश माझ्या मनांत पाझरतो. त्या प्रकाशांत मला 'मी' सांपडतों. तत्क्षणीं त्रिखंडाला अर्थ येतो. प्रत्येक वस्तु बोलकी होते. पिंपळपानें सतार छेडतात. फांद्या टिपऱ्या खेळतात. वारा शीळ घालतो. पागोळ्या जलतरंग वाजवितात. छोटे छोटे ओहोळ खळखळून हंसतात. डोंगरखांद्यावरून उडी मारणारे जलप्रवाह

पायथ्याच्या खडकावरील नगारा बडवितात. वळवाची सर गिटार-वाद्याच्या तारा छेडून जाते.

तेव्हां उरतात फक्त कर्ण—आणि त्या कर्णाद्वारें नादब्रह्माला सामावून घेणारें स्वरार्त मन ! त्यावेळीं स्वर हेंच एक सत्य वाटतें. सगळ्या चराचरांतून त्या स्वरसत्याचे पडसाद ऐकूं येतात.

वर्षाऋतूच्या ह्या पदन्यासानें रस, रूप, गंध, स्पर्श, नाद ह्यांचीं फुलें पृथ्वीच्या अंगप्रत्यंगीं फुलतात. त्या पंचविध फुलांमुळें माझ्या पंचेंद्रियांचा उद्धार होतो. आणि तीं इंद्रियें त्या त्या सौंदर्याचे कलश भरभरून मनावर शांतीचा अभिषेक करतात. चैतन्याचा संदेश पोंचवितात.

परंतु ह्यामुळेंच सारें बिनसते !

नाकासमोर दिसणाऱ्या दगडी रस्त्यानें चालणारें मन पार उधळतें. काळकामवेगाची संस्कृति झुगारून ते खुशाल वर्षाऋतूचीं सांडलेलीं प्रसादचिन्हें धुंडाळीत शरदाच्या चांदण्यांतून, हेमंताच्या दंवभिजल्या तृणांतून, वसंताच्या आम्रमोहरांतून भटकत राहतें. ग्रीष्मांत त्याला पुन्हां कसेंबसें पंजरीं आणावे न आणावे तोंच तें पुन्हां हुंदडत बाहेर पडते. कारण, वर्षाऋतूच्या मृदुंगाच्या पद-न्यासानें सारीं इंद्रियेंच त्याला फितूर झालेलीं असतात !

* * *

# बोलायचें कुणाशीं ?

कुणाला चहा आवडो किंवा न आवडो; परंतु चहापानाचा कार्यक्रम मात्र सगळ्यांनाच आवडतो. चहा न घेणाऱ्यांनींहि चहापानाच्या कार्यक्रमाला अवश्य यावें, अशी निमंत्रकाचीहि इच्छा असते. म्हणूनच तो कॉफी, कोको किंवा दूध अशा चहाला पर्यायी पेयांची तरतूद करून ठेवतो. कारण चहापानांत चहाला महत्त्व नसून त्या निमित्ताने घडणाऱ्या संभाषणाला महत्त्व असते, असे मानले जातें. चहापानाचें निमित्त करून हे लोक चक्क इतर विषयांवर तोंडसुख घेतात. कोणत्याहि चिल्लर-थिल्लर वा सुतकी-गंभीर विषयावर बोलायचे झाल्यास चहापानाचा मंडप उभारला जातो.

चहापानाचें हे लाघवी स्वरूप पाहून मीदेखील सुरवाती-सुरवातीस चहापानाच्या कार्यक्रमास जात असे. जेथें मनमोकळें बोलतां येईल, निर्भरतेनें खळखळून हंसतां येईल, असें हें स्थळ असावें अशी माझी अपेक्षा होती. आणि दुसऱ्याशीं तोंड भरून

बोलणे ह्यासारखा दुसरा आनंद नाहीं ! संगीताच्या खालोखाल जर काहीं मला मनापासून आवडत असेल तर ते म्हणजे दुसऱ्यांशीं संवाद करणें होय. मनाला आवडलेली गोष्ट दुसऱ्याला सांगितल्या-शिवाय माझ्या आनंदाला पूर्णताच येत नाहीं.

यावरून मला खूपच मित्र असावेत असा जर निष्कर्ष काढला तर तो फारसा बरोबर ठरणार नाहीं. जे आहेत त्यांच्या सहवासांत मी दिवसाचा बराचसा भाग घालवीत असेन असेंहि म्हणतां येणार नाहीं. म्हणजे मी ह्या मित्रांशीं बोलत नाहीं असें नव्हे. तसें मी लहानग्या मंजूपासून आमच्या गल्लींतल्या रात्रींच्या पहारेकऱ्यापर्यंत सगळ्यांशींच ' चार शब्द ' बोलतो. परंतु त्या बोलण्याला नेहमींच माप असतें, मर्यादा असते. हे बोलणे केव्हां संपेल ह्याची काळजी असते.

परंतु दिवसांतून असेहि कांहीं क्षण येतात कीं, त्या वेळीं कुणाशीं तरी खूप खूप बोलावेसे वाटते. एखादी लावण्यमयी कल्पना किंवा आर्त हुरहूर मनांत अंकुरते, उमलते आणि पाहतां पाहतां आकाशाएवढी मोठी होऊन मनांत मावत नाहीं. असे झालें म्हणजे मी माझ्या मित्रांकडे धांवत जातो. मनांत रसरसून उन्मेषणारा आशय शब्द-फुलांतून आविष्कृत होण्याकरितां अधरांवर येऊन उन्मत्त लाटांप्रमाणे धडका देतो. डोळ्यांत एक स्वप्नाळू भाव तरळूं लागतो. आणि मी अति उत्सुकतेने मित्राच्या डोळ्यांकडे पाहतों.

आणि जें व्हायचे तेंच होते. माझी स्वप्नाळू नजर त्याच्या नजरेशीं भिडतांच पाण्याच्या शिडकावानें उतूं चालल्लेल्या दुधानें खालीं बसावें तद्वत् मन हिरमुसतें. कांठोकांठ भरलेला माझा उत्साह

मित्रांच्या त्या संथ प्रतिसादानें 'वसुदेवाच्या पेल्या'प्रमाणें क्षणांत रिता होतो. हा सारा खेळ क्षणार्धांत होतो. आणि मग माझ्यांत कांहीं तरी ढवळून निघालें होतें ह्याची जाणीव मित्राला होण्याच्या आंतच मी स्वतःला सावरून घेतो. तरीदेखील मावळणाऱ्या संध्या-रागाचे कांहीं रंग इतस्ततः विखुरलेल्या ढगांवर राहून जावेत, तसे मघाच्या उत्कटतेचे कांहीं संस्कार नंतरच्या माझ्या बोलण्यांत जाणवल्याने मित्र मला खोदून खोदून विचारतो. परंतु नंतरच्या त्या उसन्या कुतूहलाने मला कितीहि छेडलें तरी, मघाच्या गीताचे सूर पुन्हां जमत नाहींत; विरस पावलेली शब्दसारजा फुलत नाहीं; डोळ्यांत ओहोटीस लागलेल्या भावनेला फिरून भरती येत नाहीं.

मी जखमी अन्तःकरणाने परत फिरतों.

परंतु परत फिरलों तरी कुणाशीं तरी मन मोकळें करून बोलण्याची आंतली गरज माझ्या एकलेपणाचा फायदा घेऊन उसळून वर येते. आणि मग 'बोलायचे तरी कुणाशीं?' हा एक नवा यक्षप्रश्न माझ्यासमोर उभा राहतो. 'दिठीच पाहतां निविजे। कां तोंड भरोनि बोलिजे। ना तरी दाटूनि खेव दीजे। ऐसे कवण आहे॥' असले शोधन सुरू होते.

मला वाटतें, अशी गरज ज्या क्षणीं निर्माण होते, त्या क्षणीं प्रत्येकाला अलौकिकाचा स्पर्श होऊन त्याच्या जीवनांत एका 'नव्या सख्याचें' आगमन होतें. तो सखा मग सासुरवाशिणीच्या बाबतींत नदीचा भंगलेला घाट बनून येतो; आणि तिच्या मनांत दाटलेलीं सुखदुःखें अपार सहानुभूतीनें ऐकून घेतो. कुणाच्या जीवनांत तो सागरकिनाऱ्याच्या स्वरूपांत अवतरतो आणि त्याच्या

हृदयांतील ऊर्मीऊर्मींना फेनधवल लाटांचे हात उंचावून अलगद झेलून घेतो. कुणाच्या आयुष्यांत सकाळ-संध्याकाळचे क्षितिज बनून येतो आणि त्याच्या अंतरंगांतील सप्तरंगी आशयाचित्रांना समेची साथ देतो. तुकारामाच्या आयुष्यांत तर 'तो' भंडारा डोंगर बनतो; आणि त्याच्या अंत:करणांतील तळमळीस प्रसादमय अभंगवाणीचें रूप देतो.

झांपड लावलेल्या रोजच्या धबडग्यांत मात्र कंठापासून बोलण्याची एकच भाऊगर्दी उडालेली असते. त्यामुळें 'कुणाशीं बोलायचे?' हा प्रश्न निर्माण होण्याइतकी उसतच नसते. आलेला दिवस जगून काढण्याची एकच धांदल उडालेली असते. माणसें सारखीं एक-मेकांशीं बोलत असतात. परंतु त्याच वेळीं तीं एकमेकांपासून शत-योजने दूर असतात. आपलीं वरवरचीं सुखे घोळून दुसऱ्यांना सांगून आपल्या वेगळेपणाचा आभास निर्माण करतात; तर कधीं आपली व्यथा दुसऱ्यापासून लपवून आपले जीवन खाजगी असल्याचा अभिमान बाळगतात. त्यामुळें दोन्ही वेळां 'सुखे दुजाच्या हिरवळ चित्तीं। दु:खें डोळां पाणी॥' ह्या भूमिकेवर तीं कधीं येतच नाहींत; एकमेकांना समजून घेत नाहींत. सदाफुलीसारखी वाणी सदा फुललेली असूनहि त्या राठ शब्दांच्या चाहुलीनें आंतले कोमल उत्कट भाव लाजाळूच्या झाडासारखे अंग मिटून देशोधडीला लागतात.

परंतु ह्या धबडग्याचा उबग येऊन जेव्हां 'बोलायचें कुणाशीं?' ह्या सुगंधाचा वेध मला लागतो, तेव्हां मी कस्तुरीमृगासारखा सैरावैरा धांवत सुटतों. कधीं चांदण्या रात्रीं माळावर बसून आकाशाकडे टक

लावून पाहतों; त्या वेळीं माझ्या मनांतील आशय कारंजासारखा उत्स्फूर्ततेनें बाहेर पडतो आणि अमित चांदण्यांशीं हितगुज करीत बसतों. कधीं मी माझ्या अभ्यासिकेंत पुस्तक वाचत असतांनाच पश्चिम क्षितिजाच्या खिडकींतून तो 'स्वप्नसखा' सुगंधी पावलांनीं येतो आणि आपल्या प्रसादमय हातांनीं माझे चर्मचक्षु मिटतो. तत्क्षणीं मी त्याला ओळखतों. त्याचे दोन्ही खांदे घुसळून त्याला माझ्या शेजारीं बसवून घेतो. आणि वाचलेल्या भागांतील उपमासौंदर्य, नादमधुर शब्द-योजना, तरल प्रतीकें यांचे रसग्रहण करीत बसतों. त्या वेळीं त्याचा चेहरा ताज्या फुलाप्रमाणे फुलून निघतो. आमच्या त्या गप्पा ऐकायला काळहि ओठंगून उभा राहतो.

कधीं मानवी जीवनांतील नियतीच्या अबोध तांडवनृत्याने मी दिङ्मूढ झालों म्हणजे तो 'स्वप्नसखा' माझ्या खांद्यावर आश्वासनाचा हात ठेवून जीवनाचा अन्वयार्थ समजावून देतो. कधीं कधीं तो दूरवरच्या गिरिदरींतील वृक्षवल्लरींतून हिरवी साद घालतो; आणि जादूने भारल्यागत मी त्याच्याकडे धांवून जातो. त्या वेळीं तो मला फळाफुलांतील, पर्णापर्णांतील अनेकविध रंग-आकृति-सौंदर्याचें विश्व-दर्शन घडवितो. तें सौंदर्यपान करतांना माझ्या मनांत बोल उमटनात—
'माझें सुख मोठें, सुख मोठें, ठेवुं कळेना कोठें।'

हा 'स्वप्नसखा' भेटला म्हणजे तिळ्यातिळ्यावरील ग्रामोफोनच्या तबकडीसारखें चालणारे बोलणें बंद होतें. पण 'वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें।' झाल्यानें मन हजार मुखांनीं बोलकें होतें. एकीकडे 'दुसऱ्यामध्यें कोण मिळे। छंद चाळे बहुमतें।' असल्या शब्दांतून तुसडेपणाचा आभास होत असला तरी 'जेथें जेथें जासी।

तेथें मजचि तूं पाहसी ॥ ऐसा पसरीन भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥ ' असा सर्वस्पर्शी सुवास दरवळत असतो.

मला तर वाटतें, ' बोलायचे कुणाशीं ? ' असें वाटायला लावणारा क्षणच माणसाच्या जीवनांतील ' पसायदान ' आहे. असल्या क्षणांच्या स्पर्शानेंच माणसांचीं मनें विशाल होतात. माणसामाणसांतील शारीरिक तट धडाधड कोसळून पडतात आणि मनें परस्परांत मिसळून जातात.

* * *

# विकत घेतलेलीं माणसें

बोलण्याच्या गरजेमुळें माणसांचा मेळावा जमतो आणि वाचण्याच्या ओढीमुळें पुस्तकांचा गराडा पडतो. गप्पा जशा बाजारी मोल न देतां पदरांत पाडतां येतात, तसेंच वाचनहि फुकटांत साधतां येतें. वाचनाच्या बाबतींत अगदींच उपोषण घडूं लागलें तर मासिक हप्त्याचा ‘आंवळा’ देऊन भाराभर पुस्तकें वाचून काढण्याचा ‘कोहळा’ वाचनालयांतून मिळवितां येतो. आपली वाणी लाघवी असेल तर दुसऱ्याचीं पुस्तकें हातउसनीं आणून अलिप्त मनाने परत करतां येतात.

मात्र ‘पुढें वाचीत जावें, मागचें विसरावें’ ही दुडकी चाल कधीं कधीं अडखळते. एखादें पुस्तक वाचून झाल्यावर देखील संपत नाहीं. परत केल्यावर देखील जात नाहीं. कामाच्या धबडग्यांतून थोडेसें मोकळें होतांच तें खायला उठतें. खरें म्हणजे आपलाच दाम खोटा! माझें मनच मुळीं फितुर होऊन त्या पुस्तकाशीं संगनमत करीत असतें. म्हणून मग मी तरातरा दुकानांत जातों आणि

तें पुस्तक विकत घेतों. घरीं आणतों आणि लगेच हलक्या हातानें फडताळांत ठेवतो.

आतां यापुढची हकीगत खरी सांगायची म्हणजे मी ते पुस्तक पुन्हां क्वचितच उघडून बघतों. कामाच्या धबडग्यांत वेळ होत नाहीं. पण हें कारणहि तितकेसें खरे नव्हे. वेळ होत नसता तर आणखी नवीं पुस्तके आलीं नसतीं. खरे म्हजजे वेळ असतो तेव्हांदेखील मी त्यांना हाताळत नाहीं. फार झालें तर उडत-वागडत उलगडून बघतों. लहानपणीं मावशीच्या पदराला तोंड पुसून मावशीकडून ओरडून घेतल्याशिवाय चैन पडत नसे. आतां मावशी घरांत आहे, या जाणिवेवरच भागतें. तसेच ह्या फडताळांत अगत्यानें आणून ठेवलेल्या पुस्तकांच्या बाबतींत होते. अगदीं सुरवातीस घेतलेलें 'स्मृति-चित्रे' हें पुस्तक पहिल्या वाचनानंतर फार तर दोन-तीन वेळां चाळले असेल. परंतु पुस्तक चाळलें नसलें तरी लक्ष्मीबाई टिळक रातराणीप्रमाणें आपल्या अस्तित्वाचा सुगंध दरवळत आहेत याचा प्रत्यय मला दरक्षणीं होत असतो. तीच गोष्ट 'स्मृति-चित्रां'-जवळच असणाऱ्या 'कांहीं म्हातारे आणि एक म्हातारी'ची. धूळ खात पडलेल्या पानांतूनसुद्धां त्यांची चिरतरुण जीवनसन्मुखता घठलेल्या झाडावरील पालवीप्रमाणें तरतरून वर आलेली भासत असते. ह्या फडताळांत नंतर कितीतरी माणसें येऊन राह्यलीं. ॲमीलची 'चिंतनिका' घेऊन साने गुरुजी आले; 'ॲंटनी ॲंड् क्लिओपात्रा' बरोबर 'मेयर ऑफ् कॅस्टरब्रिज' उभा राहिला; विरही व्यथेचें काव्य दर्शविणाऱ्या 'मेघदूता' बरोबरच 'तुकारामवचनामृतां'तून आत्मशोधन करणारा जीवनप्रवासी तुकाराम हृदयस्पर्श करूं लागला.

वाचनवेगाच्या हिशेबानें तीं सर्व पुस्तकें एकाच वेळीं मीं वाचणें शक्य नाहीं, हा हुकमी एका हातांत धरून त्यांतल्या एखाद्या पुस्तकाची मागणी कोणीं केली तर मी लगेच अस्वस्थ होतो. मी एकेरीवर येऊन 'पुस्तक मुळींच मिळणार नाहीं' म्हणून ओरडतों. माझ्या पुस्तकांच्या बाबतींत काळकाम वेगाच्या प्रांतांतील बथ्थड वृत्तीचा प्रश्न मी समजूं शकत नाहीं. आणि आमचे मित्र मीं पुस्तकासारख्या निर्जीव वस्तूबाबत इतके जीव लावून कां बोलावें हें समजूं शकत नाहींत. परतु त्यांना ह्या वेळीं आणखी पुष्कळच गोष्टी समजणार नाहींत ह्याची मला खात्री पटते. कारण अशा वेळीं ते आपलें लहानपण विसरलेले असतात आणि माजघरांत आई आहे ह्या विश्वासावर अंगणांत एका अबोध निर्भरतेने बागडलेल्या प्रसंगांतील काव्याला ते पारखे झालेले असतात. आपले तारुण्याहि ते विसरलेले असतात आणि घरांत पत्नीचें गानरम्य विहरण चालू असतांना दिवाणखान्यांत दरवळणाऱ्या प्रसन्न आणि तरल वातावरणाशीं कृतघ्न होतात. एकाच गांवांत राहून न भेटणारा मित्र परगावीं जाऊं लागतांच अंतःकरणांत निर्माण झालेल्या आणि उत्कटतेचें दर्शन घडविणाऱ्या हुरहुरीशीं प्रतारणा करतात.

खरे म्हणजे कासवी केवळ आपल्या दृष्टीनें पिलांचें पोषण करते त्याप्रमाणे हीं पुस्तकें नुसत्या त्यांच्या फडताळांतील अस्तित्वानें माझें जीवन सांवरून धरतात; जीवनाचा अन्वय लावण्याची दृष्टि देऊन माझे भावजीवन समृद्ध करतात आणि 'ते जे लोचन आंत खोल दडले' त्यांना उघडून चराचरांतील सौंदर्यपुष्पांचें दर्शन घडवितात.

माझ्या समजुतीप्रमाणें माझ्या फडताळांतील पुस्तकांची तार्किक मागणी करणाऱ्या लोकांना घराचा सम्यक् अर्थच अद्यापि समजला नसावा. त्यांच्या दृष्टीनें घर म्हणजे म्हणजे आहार-विहार, निद्रा, भय, इत्यादि गरजा निवारणारें एक ठिकाण असते. वास्तविक 'गरजा साधनस्वरूपाच्या असतात आणि घरामध्यें ह्यापेक्षां अधिक कांहींतरी असतें' ह्या साक्षात्काराकडे ते पाठ फिरवूनच बसलेले असतात. आणि कौटुंबिक जीवनांतून लाभणाऱ्या एका पसायदानाला ते आंचवतात. एखाद्या प्रसन्न क्षणीं ह्या पसायदानाचें अस्पष्ट दर्शन त्यांनाहि होतें. आणि त्या दर्शन-काळांत हीं माणसेहि मग बाजारांतून एखादें चित्र, एखादें शिल्प वा पुस्तक आणतात. खरें म्हणजे ते ह्या वस्तु आणीत नसून त्या वस्तूच्या माध्यमानें एक रसिक माणूसच आपल्या भावजीवनांत आणीत असतात. त्या रसिक माणसाच्या आगमनानें त्यांच्या अंत:करणांतील पारिवारिक जीवनाची धारणा नव्या जोमानें पल्लवित होते. बाजारांतील चौकटींतून स्वत:चें मूल्य सांगणाऱ्या वस्तु घरांत येतांच आत्मीयतेच्या स्पर्शानें अमूल्य होतात. एकलेपणाची विकृति देशोधडीला लागून हृदयांत संवादाचा उदय होतो. 'कलंदरा'च्या किंवा 'राजाराणी'च्या जीवनाची कक्षा विस्तार पावते आणि घराला पारिवारिक जीवनाचा सुगंध लाभतो. आणि मग दिवसभर पोटासाठीं दाही दिशा भटकणाऱ्या पायांना सायंकाळीं हीं विकत घेतलेलीं रसिक माणसें घराचा स्पर्श करतात. तेव्हां पायांवर सत्ता चालते हृदयाची! म्हणून तर पांखरें ज्या ओढीनें कोटरीं परततात, गुरें गोठ्याकडे धांव घेतात, त्याच ओढीनें मीहि माझ्या खोलीकडे धांव घेतों. अधीर होऊन कुलूप काढतों. आणि

डोळे भरून ह्या ' माणसां ' कडे पाहतों. त्या वेळीं तें फडताळ म्हणजे ' आश्वासस्नेहभक्तीनां एकं आयतनं महत् ' आहे, ह्याची तीव्रतेनें जाणीव होते. दिवसभराच्या दिशाशून्य धडपडीवर अन्वयार्थाचा प्रकाश पडतो. पोरकेपणाचें सांवट विरतें. पारिवारिक जीवनाचे वासंतिक वारे वाहूं लागतात. सहन केलेल्या व्यथेला बदामी डोळा फुटतो. पुस्तकांतील हीं अनेकविध माणसें उबगलेल्या माझ्या मनाला पुन्हा जीवनसन्मुख करतात. आजूबाजूच्या माणसांकडे ' समजून घेण्याच्या ' वृत्तीनें पहावयास प्रवृत्त करतात. वनवासांतील पांडवांना ऋषीमुनींनीं निरनिराळ्या राजांच्या खडतर जीवनकथा सांगून रिझवावें, त्याप्रमाणें हीं ' विकत घेतलेलीं ' अमूल्य माणसें आपले जीवन अंतःकरण मोकळे करून सांगत सांगत मला प्रफुल्लित करतात. त्यांच्या शीतल आत्माविष्कारानें जिकडे तिकडे मृद्गंधाची उधळण होते. प्रशांततेची वैजयंती माळ गळ्यांत पडते. अंधाऱ्या रात्रींच चांदणें फुलतें आणि उद्यांच्या उषःकालाची प्रतीक्षा करीत शांत झोप लागते.

परंतु त्याकरितां माणसांचीच भूक पाहिजे. पण तेवढ्यावरहि भागत नाहीं. ' दुसऱ्या माणसाला समजून घेण्याची इच्छा जागृत असणें ' हीच प्रकृति झाली पाहिजे. म्हणजे मग हीं ' विकत घेतलेलीं माणसें ' जीवनांतील गैरसमज, क्रोध, द्वेष, मत्सर आदि षड्रिपु हे कसे धुक्याप्रमाणें आहेत, ह्याचा प्रत्यय आणून देतात. हितगुजाचा कौमुदी प्रकाश पाडून तुमच्या - आमच्या विश्वांत सौंदर्य, सामर्थ्य आणि समृद्धि कशीं अणुरेणूंत भरलीं आहेत, याचें दर्शन मोठ्या रसिकतेनें घडवितात. मातीपासून दूर पळणाऱ्या पायांना

मातीच्या दुर्दम्य सृजनशीलतेची प्रयोगशील दृष्टि देतात आणि ह्यासाठीं ‘परोपदेशा’चें विफल माध्यम न वापरतां स्वतः जीवन जगत दुसऱ्याला विश्वासांत घेतात. माझ्या टीचभर खोलींत म्हणूनच कधीं ‘एकच प्याल्यां’तील सिंधु हंसऱ्या वृत्तीने दळत बसलेली दिसते, ‘उत्तररामचरितां’तील राम दंडकारण्यांत सीतेच्या स्मृतीनें विव्हळ झाल्यानें आपल्या प्रजाजनांची मनोमन क्षमा मागतो आणि आपल्या अंतःकरणांतील दोन बाह्यतः विरोधी दिसणाऱ्या भावनांच्या संघर्षांतील काव्य दर्शवितो. कधीं ‘सतारीचे बोल’मधील केशवसुतांची विभूति विश्वामाजीं कशी पसरत जाते, ह्याचे तरल दर्शन घडते.

म्हणूनच बाजारांत प्रीति मिळत नसली तरी आपल्या जीवनांतून ‘प्रीति ही तपस्या असते’ ह्याचा प्रत्यय देणारीं माणसे मिळतात. जीवनांतला आनंद विकत घेतां येत नसला तरी तो कोणत्या प्रकारें मिळतो ह्याचे विश्वदर्शन घडविणारीं माणसे मिळतात. अशीं माणसे तुमच्या-आमच्यासाठीं कल्पवृक्षासारखीं नित्य मोहरून उभीं असतात. तुम्हीं फक्त त्यांना आपल्या घरीं आणायला हवें आणि त्यासाठीं ‘घराचा’ अर्थ समजलेला हवा.

* * *

# अशरीरिणी

ज्या लेखकाने तिची आणि माझी भेट घडविली होती, त्याच्या दर्शनाकरितांच मी आज आसुसलों होतो. यांत तिच्या संमतीपेक्षां माझ्या हट्टाग्रहाचाच भाग अधिक होता. पण या हट्टाग्रहाचा उगमहि तिच्या परिचयांतच नव्हता काय ? असा स्वसमर्थनात्मक प्रश्न विचारून मी माझ्या हट्टाग्रहाचे अपरिहार्यत्व प्रतिपादत होतो. कारण ह्यापूर्वीं मीं कधीं पुस्तक वाचून झाल्यावर लेखकाची लौकिक चौकशी केली नव्हती. उलट, ह्या नव्या वेधानें तिने मलाच अस्वस्थचित्त केले होतें....

इतक्यांत ज्याच्या दर्शनाकरितां मी आलों होतों, तो लेखक समोर आला. त्याला पाहतांच मी गोंधळलो. तिनें त्याचें जें रूप उभें केलें होतें, त्याच्याशीं प्रत्यक्षांतील हे पंचमहाभूतात्मक रूप जुळत नव्हतें. अर्थातच हें मला पेलले नाहीं ! मीं हिरमुसल्या मुद्रेनें तिच्याकडे प्रतिसादाकरितां पाहिले. पण....पण ती तर केव्हांच माघारीं परतली होती. झपाझप पावलें टाकीत खूप लांबवर गेली

होती. मला हें तिचें अवसानघातकी कृत्य मुळींच आवडलें नाहीं. लेखकाची भेट घेण्याचा हा अकाल हट्ट मीं धरूं नये, असे जरी तिचें मत होते तरी काय झाले ? ती अशी तडकाफडकीं निघून गेल्याने मी कसा उघडा पडलों, ह्याची तिला जाणीव असायला नको का ? मग मी तरी काय करणार ? क्लिओपात्रा निघून गेली असे कळतांच रणसागर सोडून जाणाऱ्या ॲटनीप्रमाणें मी लेखकाशीं त्रोटक बोलून तिच्यामागून फरफटत गेलों.

तिच्याशीं परिचय झाल्याचा हा पहिलावहिला प्रसाद मला फारच लागला ! त्या लेखकावर आपण अन्याय केला, असे सारखे वाटून चुकल्यासारखे होऊं लागले. अपराधी मनाने घरीं येऊन मी त्याचें पुस्तक घेऊन बसलो. हळुवार हातांनीं त्याला कुरवाळलें. विमनस्कपणे त्याचीं पानें चाळलीं. मधूनच कुठें तरी वाचायला सुरुवात केली. असे अस्थिर वाचन सुरू असतांनाच केव्हां कुणास ठाऊक ती हलक्या पावलांनीं आंत आली आणि माझे दोन्ही डोळे झांकून म्हणाली, " रागावूं नकोस. हा बघ तुझा आवडता लेखक. अक्षराअक्षरांतून आणि पानापानांतून त्याचें अव्याजमनोहर रूप रसरसून आलें आहे."

" पण तूं मघां अशी सोडून कां गेलीस ? " मीं फुरंगटून विचारलें.

" ते तुला इतक्यांत कळायचं नाहीं. ? "

" मला कळत नाहीं म्हणून तर तुला विचारतोंय् ना ! "

" पण तें सांगून कधीं कळणार नाहीं. "

" म्हणजे मला बनवितेस होय ? "

" होय ! तुला घडवतेंय. पण माझ्या शक्तीनं नव्हे, तुझ्या वेगानं. "

" हें कांहीं मला कळत नाहीं. पण तूं माझ्याबरोबर आलं पाहिजेस. कबूल ? "

" बरं, कबूल ! "

ह्या समजावणीने मी खुशींत येतो. आणि मग कितीतरी वेळ तें पुस्तक मी वाचीत राहतो. तीहि माझ्या शेजारीं बसून आल्हादाचीं फुलें माळूं लागते. तिच्यामुळे तो लेखकहि मिटलेल्या पुस्तकांतून बाहेर डोकावतो आणि पुन्हा मनमोकळेपणाने हितगुज करूं लागतो. त्या गप्पा चालू असतांनाच आई येऊन मला गदागदा हलवीत म्हणते, " अरे, केव्हांचं वाढून ठेवलं आहे. हांका तरी किती मारायच्या ! "

मी भारावलेल्या पावलांनीं माजघराकडे चालूं लागतो. माजघरांत शिरतां शिरतां मी मागे वळून पाहतो. ती चक्क तोंडावर हात ठेवून हंसत असते !

नंतर दिवसभरांत ती फारशी भेटतच नाहीं. कामाच्या धबडग्यांत मलाहि तिची आठवण होत नाहीं; गरज भासत नाहीं; ठरलेले काम वेळेवर व्हावे म्हणून मी रस्त्याने टांग्याच्या घोड्याप्रमाणे सरळ जात असतो. पण मध्येंच एखादें दृश्य आगंतुकपणे माझ्या दृष्टिपथांत येतें. आणि कुठेंतरी कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें सुरकुतलेला चेहरा गुबगुबीत मुलाचा मुका घेतांना दिसतो. ते मूलहि बेटे खुशाल त्या थरथरणाऱ्या गळ्याला मिठी मारतें ! माझ्या चेहऱ्यावर नापसंतीची मुद्रा आकारूं लागणार इतक्यांत ती कोठून तरी अलगद येते आणि आपल्या

कुसुमकोमल करांनीं माझे डोळे झांकते. तेव्हां कांहीं तरी जादू होते! दुपारच्या उन्हाचे श्रावणी सोनें होते आणि समोर दोन बिनवयाच्या भावना परस्परांशीं हितगुज करतांना दिसतात. अंतः-करणांत सह-अनुभूतीच्या सौरभ-ऊर्मि उसळतात. माझ्या डोळ्यां-वरील तिचे हात सोडवून मी तिला पाहूं लागतो. पण ती कुठेंतरी दूर गेलेली असते........

तिच्या अशा वागण्यानेच मला तिचा राग येतो. पुन्हा तिला कधीं भेटायचे नाहीं असे मी ठरवितो. ही अंतर्मुख करणारी हुरहुर नको म्हणून मी मुद्दामच वस्त्रप्रावरणांच्या जगांत जातो. त्या अड-सराला टेकून उगाच पाहत राहतो. परवांचीच गोष्ट. गायन-समाजाचा वाढदिवस होता. अर्थातच मीहि तेथे गेलो. चांगला नटूनथटून गेलो. सगळे तसेच आले होते. आपली देहलता तलम वसनांनीं खुलवीत, खुणावीत सर्वच एकमेकांकडे न पाहिल्यासारखे करून पाहत होते. डोळ्यांच्या तराजूने परस्परांच्या सौंदर्यभूषणांची किंमत अजमावीत होते. त्यांत स्वतःचे स्थान ठरवीत होते. तोंडाला लावलेल्या पावडरच्या कारखान्याचे नांव शोधण्यांत गुंतून पडत होते.

तिकडे गाणें केव्हांच सुरू झाले होते. स्वर लागला होता आणि तबलजीने सम साधून एकतालाला सुरुवात केली होती. पण अजून मी सुताच्याच विश्वांत होतो. ते पाहून ती अपार करुणेनें माझ्याकडे धांवत आली आणि आपल्या स्वरकोमल हातांनीं तिने माझे नेत्र झांकले. तेव्हां माझें देहासक्त मन निमिषांत अनिकेत झाले आणि स्वरांच्या अरूप लयींबरोबर विश्वसंचार करूं लागलें. तबला सारंगी आणि

गायक ह्यांच्या स्वरांबरोबर मी आणि ती फेर धरून नाचूं लागलों. नादब्रह्माच्या त्या अनेकविध नृत्यविभ्रमांत आकाशाचा स्पर्श मला झाला. सम साधून गायकानें राग संपवितांच तिनें मला अल्लद जागेवर आणून बसविलें. स्वरांच्या माहेरीं गेलेले माझें मन त्या वेळीं विलग झालेल्या अधरांत उमलणाऱ्या फुलाचें स्मित होऊन झुलत राहिलें........

तिनें आतां मला पुरतेंच झपाटलें होते. त्यामुळें माझ्या दृष्टीच्या विश्वांत एक नवाच प्रकाश पडला. त्या प्रकाशांत दिवाणखान्यांतील वयोवृद्ध गांधीजी आणि वसंतवयी जवाहरलाल ह्यांचा फोटो पाहतांना वयाच्या अंतराचे धुकें पार विरते आणि तेथे उरतें फक्त अतर उमलविणारे सकाळचे कोवळे ऊन! माझीं मतेंसुद्धां आतां पार बदललेलीं आहेत. माझ्या त्या मिटलेल्या डोळ्यांनीं सरळ सरळ मी म्हणतो कीं, "इतिहास-संशोधकांच्या दृष्टीने जरी ज्ञानेश्वरांनीं एकविसाव्या वर्षीं आणि नामदेवांनीं ऐंशीव्या वर्षीं शरीर सोडलें असलें तरी माझ्या मतें त्यांनीं एकाच वयाचे असतांना शरीर सोडलें! पाहिजे तर तिला विचारा. ती तर चक्कच म्हणते कीं, ज्या भावनेच्या आधारावर माणूस साहित्यिक होतो, त्या भावनेला वयच नसतें. असलें तर तें समान असतें."

भावनेला शरीरगत वय नसतें, तसेच ज्ञानालाहि नसतें. म्हणूनच शिष्याकडून पराजयाचें पुष्प स्वीकारतांना गुरूला खरोखरच हर्ष होतो.

तिचा हा अंधपणाचा प्रसादस्पर्श झाला म्हणजे एक नवीच अशरीरिणी दृष्टि मिळते. त्या दृष्टीच्या समेवरच भिन्न वयाच्या

रसिकांची भेट होते आणि मग आनंदाचा सोहळा दशदिशांत उफाळतो. त्या दृष्टीच्या प्रकाशांतच एकनाथ आणि वाळवंटांतील पोर ह्यांच्यांतील सोवळ्याओवळ्याचा पट फिटतो. फुलांच्या सौंदर्यानें लुब्ध झालेलें मन त्याला खुडणाऱ्या हाताला मागे खेचते आणि त्या पाकळ्यांच्या क्षितिजापलिकडून डोकावणाऱ्या सौंदर्य-उषेचे रसपान करीत बसते; कृतककोपामागील अकृत्रिम अनुराग पाहते; सायंकाळीं आईनें मारल्यावरहि रात्रीं तिच्या कुशींत घुसणाऱ्या बालकाचा मनोधर्म समजूं शकतें....

तिच्या ह्या प्रीतीनें मी पुरता आंधळा झालों आहे, अशी खात्री वाटल्यानेंच ती आतां मला कुठेंहि मुक्तपणें हिंडूं-फिरूं देते. त्या माझ्या पहिल्या आवडत्या लेखकाकडेसुद्धां ती यायला तयार होते आणि पूर्वींसारखा मी आतां बिचकत नाहींसे पाहून ती खुदकन् गालांत हंसते....

* * *

# कुंतीचें मागणें

जवळ जवळ वर्षभराने मी घरीं आलों होतों. येतांना शहरांतून बराच खाऊ आणला होता. ज्याचा त्याचा हविर्भाग देऊन झाल्यावर शेवटीं पिवळींधमक व शिव्याशिव्यांचीं केळीं आईपुढें ठेवलीं. परंतु तिने अगदीं 'लाभालाभौ समे कृत्वा' च्या निर्विकार दृष्टीने त्याच्याकडे पाहिलेलें बघून मला जरा आश्चर्यच वाटले, आणि मीं म्हटले : "आई, तुझीं आवडतीं केळीं आणली आहेत."

"अरे हो! परंतु मीं केळीं खाण्याच सोडलं आहे."

"म्हणजे? कसलं पथ्य वगैरे?–"

"नाहीं, तशी माझी प्रकृति ठीक आहे. दुसरंच कारण आहे. परवां मी काशीला गेलें होतें ना, तेथें एखादी आवडती वस्तु सोडायची असते. मला केळीं फार आवडतात म्हणून केळींच सोडलींत झालं."

काशीचे नांव काढतांच उलटतपासणीच खुंटली. कारण 'काशीस जावे' असे जरी मी नित्य वदत नसलों तरी कधीं काळीं

काशीला जायची इच्छा माझ्या भावार्द्र मनांत इंद्रधनुष्यासारखी प्रकट होते. परंतु आज आईने सांगितलेल्या-ह्या खास माहितीवरून एक नवीनच अडथळा निर्माण झाला म्हणायचा! म्हणजे मला जर काशीला जायचे असेल तर माझी आवडती वस्तु सोडावी लागणार कीं काय? परंतु माझी आवडती वस्तु तरी कोणती?

आईला केळीं आवडतात तशीं मलाहि केळीं आवडतात. पिंवळ्या शेवंतीच्या कांतीचीं केळीं सोलतांना त्यांचा उमलत्या सोनचांफ्याप्रमाणे होणारा आकार तर स्वतःच्या अंगीं सूर्यकिरणां-प्रमाणें फुलांना उमलविण्याचे 'नाजुक सामर्थ्य' असल्याचा आल्हाद-दायक प्रत्यय आणून देतो. आपली 'मेणाहुनी मऊ' असलेली वृत्ति पाळण्याकरितां तीं केळीं बीच्या रूपानेदेखील कठीणतेचा किंतु ठेवीत नाहींत. केळींवरच काय, परंतु एकंदर खाण्यावरच माझें मनापासून प्रेम आहे. (अज्ञ लोक यालाच खादाडपणा असें म्हणतात!) शूर योद्धा जसा शत्रूला पाठ दाखवीत नाहीं, तसा मी अन्नाचा आग्रह करणाराला पाठ दाखवीत नाहीं; किंवा दानशूर राजा ज्याप्रमाणे याचकाला स्वप्नातदेखील नकार देत नाहीं, तद्वत् मी स्वप्नांतदेखील खाद्य पदार्थांना 'नाहीं' म्हणत नाहीं.

एवढ्यावरून माझें 'प्रेयस्' मुदपाकखान्यांतील निर्मितीवर उभारलें आहे, असे मात्र नाहीं. कारण खाण्यापेक्षांहि मला बांसरी वाजवावयाला फार आवडतें. 'वाजवायला आवडते' याचा अर्थ (वाजवितां येतें, असा नसून) बांसरी वाजवितां यावी म्हणून तीव्र इच्छा आहे. परंतु इच्छापूर्ति तर दूरच राहो, साधा सुरेल स्वरदेखील मला अजून काढतां येत नाहीं. कुणी बांसरी वाजवायला लागला

म्हणजे मला मोठा विस्मय वाटतो कीं, मीहि याच्यासारखीच कार्बनडायऑक्साईड हवा फुंकतो आणि बोटे वरखालीं करतों; परंतु आमची हवा ' इकडून तिकडे गेले वारे ' या वाटेनें कार्बनडाय-ऑक्साईड राहूनच पसार होते आणि त्याची हवा मात्र नादब्रह्माचें लेणें लेवून बाहेर पडते ! मात्र हा विषाद-विचार प्राथमिक स्वर ऐकूं येईपर्यंतच ! बांसरीच्या त्या आर्त स्वरविस्तारांत आणि अनेकविध आलापांत माझे देहभान हळूहळू हरपते आणि माझे पाय जरी जमिनीवर असले तरी ' मी ' कुठल्या तरी अनामिक ' आनंदवनभुवनांत ' लहरत असतो. त्या स्वरसमाधींतून जडसृष्टींत परतायला फारच जड जाते.

परंतु बांसरीपेक्षांहि मला जर कोणती गोष्ट आवडत असेल तर ती ही कीं........छे! छे! चित्रलेखेने एकेक चित्र रेखाटले आणि उपेनें प्रियकराची छबी दिसेपर्यंत ' नाही नाही ' म्हणावें तसे माझे होऊं लागले आहे. म्हटले, आपल्याला कांहीं आतांच काशीला जायचें नाहीं, तेव्हां निर्णयाची निकड लावा तरी कशाला ? ह्या सर्व आवडणाऱ्या वस्तूंतील नेमक्या कोणत्या गोष्टीला ' आवडती ' म्हणून निर्देशावें हे काम, आईला ' तुला कोणता मुलगा आवडतो ' ह्या प्रश्नाइतकेच, मला अवघड वाटूं लागतें. कारण ह्या आवड-णाऱ्या वस्तूंतील वस्तु सोडली म्हणजे मग जगण्यांत काय मौज आहे ? माझे आत्यंतिक प्रेम जर कशावर असेल, तर तें जगण्यावरच होय !– ह्या विचाराबरोबर मी एकदम दचकलों. म्हणजे जगण्याची आवड हीच माझी प्रिय वस्तु कीं काय ? आणि काशीला गेल्यावर जर जगण्याची आवड सोडायची असेल तर मग

मरणावर प्रेम करायला हवें! म्हणजे घरबसल्या मरणाला आमंत्रण द्यायचें कीं काय?

ह्या कल्पनेनें मी अतिशय अस्वस्थ झालो. म्हटले, या अडचणींतून एखादा मधला मार्ग नाहीं का सांपडणार? ज्यांत जगण्याची आसक्ति उरली नाहीं आणि मरणाचा मुक्त मनाने स्वीकार करण्याची जाणीव उदित झाली आहे, अशी एखादी स्थिति नाहीं काय?

मी खोलींतील येरझारा थांबवून मांडणींतील पुस्तकांकडे सहाय्यार्थ पाहूं लागलो. नेहमीं मनाशीं नेत्रपल्लवी करणारीं पुस्तके माझ्या अडचणी निवारणारा मार्ग सांगतील म्हणून मी तीं पुस्तके चाळूं लागलो. त्यांत विविध विषयांच्या पुस्तकांचा काफिला असला तरी विशेषतः ट्रॅजेडींचा भरणा अधिक होता. 'हॅम्लेट' जवळ 'एकच प्याला' होता, 'मेयर ऑफ कॅस्टरब्रिज'शीं 'ॲटनी ॲंड क्लिओपात्रा' बोलत होते, तर 'डॉल्स हाउस'जवळच 'सेंट जोन' उभी होती. हीं आणिक त्यांच्यासारखीं इतर माणसे माझी ट्रॅजेडीची आवड पुरवायला कल्पवृक्षासारखीं मोहरून उभीं होतीं. हीं पुस्तके चाळत असतांनाच मघाचा 'काशीला गेल्यावर कोणती आवडती वस्तु सोडायची' हा यक्षप्रश्न मधूनच माझ्या ढगाळलेल्या मनांत विद्युल्लतेसारखा चमकून जात होता. म्हटलें, या 'एकच प्याल्यां'तील सिंधूला विचारावे कीं, 'तूं काशीला गेल्यावर दारू पिणाऱ्या सुधाकराचा त्याग करशील काय?' या हॅम्लेटला विचारावें कीं, 'तूं आपला 'To be or not to be' हा प्रश्न टाकशील का?' त्या कुरूप ऑथेल्लोला विचारावे कीं, 'तूं आपली आत्यंतिक प्रेमवृत्ति सोडशील काय?' किंबहुना या सर्वच नायकांना

जर विचारलें कीं, ' तुम्ही आपण होऊन स्वीकारलेल्या ह्या दुःखयातना सोडून चाकोरींतील आणि चौकटींतील सुखांशीं—ज्या सुखामुळें जगण्याचा मोह सुटत नाहीं—तडजोड कराल काय ? ' छे ! छे ! या लौकिक प्रश्नाला ' नाहीं, नाहीं ' असे अलौकिक उत्तरच ते देतील ! कारण त्यांनीं त्या दुःखदयातना उगाच का स्वीकारल्या होत्या ? दुःखयातना त्यांनीं जीवनाची किंमत देऊन पत्करल्या होत्या, त्याचें कारण त्या दुःखयातना त्यांना स्वतःच्या आत्मिक शुद्धीकरणाकडे नेणाऱ्या वाटत होत्या. त्या तशा होत्या म्हणूनच तर ' मेयर ऑफ कॅस्टरब्रिज 'मधील हेंचार्ड शेवटीं अनिकेत अवस्थेत मृत्यूचा मुक्त मनाने स्वीकार करतो. क्लिओपात्रा सर्पाच्या प्राणघातक दंशाला मृत्यूचे चुंबन म्हणून संबोधते. आत्मस्तुतीने हुरळून जाणारा पहिल्या अंकांतील पोरकट म्हातारा लिअर अनंत मनस्तापांतून विकासित होत होत, नाटकाच्या अखेरीस तडफड करीत नव्हे तर शांतपणें मृत्यूचा स्वीकार करतो.

तेव्हां अशा परिस्थितींत ते स्वतःच्या दुःखयातना सोडतील ही धोपटमार्गी कल्पना व्यर्थ आहे. नव्हे, ह्या दुःखयातना सोडल्यावर मुळीं त्यांना जगणेच असह्य होईल. उलट ह्या दुःखयातनाच्या मोबदल्यांत ते सर्व सुखांच्या राशीकडे पाठ फिरवितील. कारण ट्रॅजेडीमुळें त्यांची चौकटींतील आणि चाकोरींतील जीवन जगण्याची आसक्ति नष्ट होऊन मृत्यूचा मुक्त मनानें स्वीकार करण्याची जाणीव उदित होत होती आणि म्हणूनच तर मला ट्रॅजेडी आवडत होती. निदान भारतीय अध्यात्मशास्त्राच्या मातींत जन्माला आलेल्या माझ्यासारख्या रोपाला तर ह्या ट्रॅजेडीचें ' जीवन ' पोषकच वाटतें. कारण माझ्या

समजुतीप्रमाणें ट्रॅजेडी ही एक प्रकारे अध्यात्मशास्त्राचे, तत्त्वज्ञानाचें प्रात्यक्षिकच आहे.

अध्यात्मशास्त्राचे जे उद्दिष्ट कीं, जीव, जगत् आणि नियती यांच्या परस्परसंबंधांचा सुसगत विचार करणे, तेच उद्दिष्ट ट्रॅजेडीमुळे साधलें जात नाहीं काय ? ट्रॅजेडी बघितल्यावर आपलेंहि मन विचार करतें कीं, खरेच, काय अर्थ आहे या जीवनाचा ? कीं सर्व ट्रॅजेडींचा सखोल अभ्यास करून शोपेनहोअर म्हणतो त्याप्रमाणे हे जीवन म्हणजे माया आहे ? 'सत्त्व सत्त्व' म्हणून म्हणतात ते बाहेर आहे, कीं हॅम्लेट आदींना सापडले तसे ते आपल्यांतच आहे ? आत्म्याचा संपूर्ण विकास आलेल्या प्रसंगाशीं तडजोड करीत सुखमय परंतु मानहीन जीवन जगण्यांत आहे, कीं हालअपेष्टांतील जीवन हंसत स्वीकारून सुधाकरावरील गाढ प्रीतीच्या कसोटीला उतरणाऱ्या सिंधूच्या प्रयत्नांत आहे ? या प्रश्नांचीं उत्तरे जर ट्रॅजेडीच्या बाजूने असतील—नव्हे, तीं तशीं आहेतच—तर मग मी काशीला जाऊन ट्रॅजेडीचा हा 'दिव्य अश्रु' मिळविण्यासाठीं सारे 'ऐहिक हास्य' सोडायला तयार आहें.

ह्या असल्या 'दिव्य अश्रु' देणाऱ्या ट्रॅजेडीचा स्वीकार करण्यांत मी कांहीं अपूर्व करीत आहे, असे मात्र नाहीं. कारण जीवनांतील ह्या 'श्रेयसा'ची जाणीव महाभारतांतील कुंतीलाहि होती. आणि म्हणूनच तर तिने, कृष्णाने 'वर माग' म्हटल्यावर 'दुःख' मागून घेतले. कृष्णानें जेव्हां असले अलौकिक मागणे कां मागितले, असें विचारलें, तेव्हां तिनें दिलेलें उत्तर आधुनिक ट्रॅजेडीच्या रचनेंत असलेल्या आन्तरप्रवाहाशीं सुसंगतच होते. कुंती म्हणाली होती :

" तुझी आठवण नेहमीं राहावी ह्यापेक्षां मला कांहीहि नको. आणि तुझी आठवण राहायला दुःखाइतका दुसरा उत्तम उपाय नाहीं. "

ह्या उत्तरांत अभिप्रेत असलेला परमेश्वर म्हणजे आत्म्याचें सत्त्वच नव्हे काय ? आणि ते सत्त्व जर आत्मविकासाची संधि देणाऱ्या, मुक्तीच्या धडपडीकडे नेणाऱ्या ट्रॅजेडीने मिळत असेल, तर कुन्तीने आजच्या युगांत ट्रॅजेडीच मागितली असती.

आणि म्हणूनच काशीला गेल्यावर जर ह्या ट्रॅजेडीचा—ज्यामुळें जगण्याची आसक्ति उरत नाहीं, परतु मरणाचा मुक्त मनाने स्वीकार करण्याची जाणीव उदित होते—लाभ होणार असेल, तर जीवनांतील सारीं चौकटींतील व चाकोरींतील सुखे मी तेथें सोडायला आहे.

ह्याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, मी जीवनाकडे पाठ फिरविणार. माझ्या मतें तर उलट मी अधिक जीवनोन्मुख होणार. कुणी तरी म्हटले आहे कीं, " तुला ' जगायचे कसे ? ' ह्या प्रश्नाचे उत्तर हवें असेल तर आधीं ' मरायचे कसें ' ह्याचे उत्तर शोध ! "

* * *

# दूर

गोष्टींतल्या नायकाला गुलबकावलीचें फूल परसांतील फूलझाडांतच मिळाल्यानें जितका हर्ष होईल तितका मोठा हर्ष मला त्या दिवशीं व्हायला हवा होता.

कारण बेकारीच्या वाळवंटांतील मृगजळापाठीमागें हिंडून माझी उमेद दमली होती. तोच अचानक कालच गांवांतल्या गांवांत नोकरी मिळाली. परंतु नोकरी मिळाल्यानें जरी 'गड आला....' होता तरी ती नोकरी गांवांतच मिळाल्यानें 'सिंह गेल्यासारखेंच' वाटत होतें. वाटत होते कीं, कुठें तरी दूरच्या गांवीं नोकरी मिळायला हवी होती. असें कां वाटत होतें त्याचा नीटसा खुलासा मला त्या क्षणीं करतां आला नसता. घरांतील माणसांचा सहवास मला नको होता असाहि त्याचा अर्थ नव्हता; उलट गांवांतच नोकरी मिळाल्यानें तो सहवास आतां अखंडित मिळणार म्हणून मला थोडें समाधान वाटत होतें; परंतु तरीहि वाटत होतें कीं, गांवांतच नोकरी मिळवली हें कांहीं तितकेंसें बरें झालें नाहीं. मात्र, घरांतील सर्व

माणसें आनंदलीं होतीं. गांवांतील मित्रांनीं अभिनंदन केले, कृत्रिम हेवा वाटल्यासारखें दाखवून मला फुलविण्याचें नक्षीकामहि केलें. मात्र तो आनंदवर्षाव माझ्या मनाच्या कमलपत्रावर दंवबिंदूप्रमाणें शोभत असला तरी तितकाच तो अलिप्त राहूं पाहत होता. जणूं कांहीं माझ्या जीवनांतून एक मोठा अमोल ठेवा पुरुरव्याच्या उर्वशीप्रमाणें न येण्याकरितां निघून जात होता; आणि याची नुसती जाणीव मला होत होती. त्याला मी थांबवूं शकत नव्हतो. सुख आपल्या लौकिक पायांनीं चालून येत होते अन् मी कांहींतरी हरवल्याच्या अलौकिक हुरहुरींतच रेंगाळत होतो.

अशा वेळीं मग मी कधीं कधीं पुस्तक वाचीत बसतों. बहुधा तें पुस्तक कवितेचें असतें. मीं पुस्तक उलगडले आणि सुरवातीलाच 'घाल घाल पिंगा वाऱ्या माझ्या परसांत' ही निकुंबांची कविता दृष्टोत्पत्तीस पडली. पहांटेच्या आगमनाने रेंगाळणारा अंधार नाहींसा व्हावा, तसें त्या कवितेने माझ्या मनांतील हुरहुरणारे औदासीन्य मावळलें. मला आवडणाऱ्या कांहीं कवितांपैकीं ही एक कविता होती. आणखी एका वेगळ्या अर्थाने ही कविता माझ्या दृष्टीनें महत्त्वाची होती. कधीं कधीं आपण निर्लेप मनाने कविता वाचतो; तर कधीं योगायोगानें कवितेत जो भाव चित्रांकित केलेला असतो तो भाव कविता-वाचनाच्या अगोदर आपल्या मनांत तरळत असतो. या दुसऱ्या अवस्थेंत असतांनाच ह्या कवितेने माझ्या जीवनांत प्रवेश केला होता. शिक्षणाकरितां मी नाशिकला आलों होतों. आई-वडील पाऊणशें मैल अंतराच्या एका खेड्यांत होते. वर्षाऋतूनें सागरांतील जल कितीहि दूर आणून ठेवलें तरी तें जसें

नदीनाल्यांतून सागराकडे ओढ घेत असते, तसे माझे मन त्या वेळीं सारखे आईवडिलांकडे धांव घेत असे. असाच एकदां सायंकाळीं घरच्या आठवणीने हुरहुरत बसलो असतांना शेजारच्या बगल्यांतील झोपाळ्यावर झोके घेतांना मुलींनीं म्हटलेलीं 'घाल घाल पिंगा वाऱ्या........' ही कविता ऐकली. त्या कवितेतील आर्तता अतः-करणाला किती अलगद रीतीने भिडली म्हणून सांगूं ? 'चंद्रकलेचा ग शेव ओला चिंब होतो' या ओळींतील शेव ओलाचिंब कां होतो ते कांहीं मला तेव्हां नीट समजले नाहीं. मात्र घरच्या आठवणींनीं मी इतका व्याकूळ झालो की, डोळ्यांतून कढत अश्रु केव्हां स्रवले आणि त्यामुळे शर्ट ओलसर झाला ते कळलेदेखील नाहीं. सर्व-प्रकारच्या सुखसोयींत देखील सासुरवाशिणीला माहेरची आठवण येते. हा प्रसंग किती हृद्य आणि आर्त ! माहेरच्या आठवणींनीं मनांत आलेल्या आर्ततेत आणि हुरहुरींतदेखील एक प्रकारचे नाजुक सुख आहे, एक प्रकारची शीतलता आहे ! हें सुख आणि ही भावना हें स्त्रीचे—सासुरवाशीण स्त्रीचे—अमोल वैभव आहे. त्या वैभवाची नुसती कल्पना यायची असेल, तर ती फक्त आपल्या-जवळच्या माणसापासून कांहीं काळ दूर राहिल्यानेच ! शिक्षणा-साठीं वा अन्य ध्येयसिद्धीसाठीं घरापासून दूर राहावे लागलेल्या व्यक्तींनाच त्या वैभवाचे किंचित् दर्शन होऊं शकेल !

नकळत मला माझ्या पहिल्या पाठवणीचा प्रसंग आठवला. त्या वेळीं मी अकरा-बारा वर्षांचा असेन. माझ्या गांवापेक्षां एक-दोन गांवे फक्त मीं त्या वेळीं पाहिलेलीं होतीं. पैकीं एक गांव तर आठवडी बाजाराचे होते. बाजारासाठीं एक कोसावरील गांवाला

जाणें हे माझे तेव्हांचें दूर जाणे. मोठ्या खुषींत मी गाडींत जाऊन बसे. स्वत: बैलगाडी हांकावी, अशी माझी त्या वेळीं इच्छा असे. अनेक कारणांनीं मला ते सुख त्या वेळीं मिळाले नाहीं. परंतु बाजारांत जाऊन खूप खूप वस्तु खरेदी करावयाच्या मनोरथांत ते दु:ख जाणवत नसे. बाजारांत गेल्यावर मी सर्व कांहीं विसरून जाईं. घर म्हणून कांहीं असतें, याची तर मुळीच आठवण राहात नसे. दिसे फक्त बाजार आणि त्यांतील मिठाईचीं व खेळण्यांचीं दुकाने. हळूहळू सायंकाळ होई. बाजाराला आलेल्या गाड्या हळू हळू खेडेगांवाकडे परतूं लागत आणि मलाहि घरची ओढ लागे. आपली गाडी केव्हा जोडणार म्हणून मी गाडीवानाला वारंवार विचारीं; परंतु वडिलांच्या परवानगीशिवाय गाडीवानास कांहीच करतां येत नसे, आणि बाजार सरूं लागला म्हणजे वडिलांचे बाजारांतील काम वाढत असे. मला आईची सारखी आठवण होऊन मी व्याकुळ होईं. बाजारांतील पालांच्या दुकानांतून दिवे लुकलुकूं लागत, परंतु अजून वडिलांचें काम संपलेले नसे. गाडीवान माझ्या प्रश्नांनीं हैराण होत असावा. आणि मग किती वेळाने तरी गाडी जुंपली जायची! आतां घरीं जायचे, या कल्पनेने मी किती आनंदून जायचो! वडील मात्र माझ्या घाईला उद्देशून म्हणायचे, ‘ पुढच्या बाजाराला तुला आणणार नाहीं! ’ आजहि तो प्रसंग मला सुखकारक वाटतो. दोन मैल, अर्धा दिवस घरापासून दूर राहणे ज्याला असह्य वाटते तो मुलगा पाऊणशें मैलांवर सहा-सहा महिने दूर कसा राहणार, हे त्रैराशिक आमच्या घरांत चर्चेला निघाले तेव्हां मला मात्र फार आनद झाला. वर्गांतील सर्व मुलांत माझा भाव एकदम वाढला.

जिल्ह्याच्या गांवीं वडील भाऊ रहात होता तिथे मी आतां शिक्षणासाठीं जाणार होतो. तिथे काय काय गमती होत्या कुणास ठाऊक! परतु त्या वयांतील कल्पनेला ज्या ज्या गमती सुचतील त्या सर्व कल्पून मी वर्गात फुशारकी मारूं लागलो. मास्तरांनीं देखील माझे कौतुक केले. घरांत मला इतक्या दूर पाठवावे किंवा नाहीं, याचा अजून निकाल लागला नव्हता. शेवटीं वडिलांनीं जरी पाठवायचे निश्चित केले, तरी आई मात्र तितकीशी अनुकूल नव्हती. मला वडिलांचा अभिमान वाटला अन् आईचा थोडा रागच आला. न राहवून मी आईला म्हटले देखील—'तूं कांहीं वाईट वाटून घेऊं नकोस. मी तुझी मुळींच खंत करणार नाहीं.'

आणि अखेर निघायचा दिवस उजाडला. सगळ्यांनीं माझी नाना प्रकारे काळजी घेतली. माझी तयारी जगप्रवासाला निघालेल्या माणसासारखी जय्यत वाटली मला! पण एकच आवडले नाहीं. वहिनींनीं मला 'अभ्यासाकडे लक्ष असूं द्या बरं का भावोजी' असें कशाला सुचवायला हवें होते? जसा कांहीं गंमत म्हणूनच मी तेथें चाललों होतो! परंतु हा सारा रुसवा अन् बाहेरगांवीं जायची ऐट आईला शेवटचा नमस्कार करतांना क्षणांत विरघळली; आणि मी मुसमुसून रडूं लागलो. किती किती समजावलें तरी आईला सोडून जायची मला पुन्हा इच्छा होईना. हुंदके देत देत आणि डबडबलेल्या नेत्रांनीं मी माझेंपण विसरून गेलो; आणि सारें अंतःकरण घरच्या माणसांच्या प्रेमळ आठवणींनीं भरून गेलें. अशा अवस्थेंत मी गाडींत कसा बसलों त्याची आठवण मला आज नाहीं. परंतु तो दूर दूर घेऊन जाणारा क्षण मला नंतर सुखद स्मृतीचा ठेवा होऊन बसला हें मात्र खरें.

आणि सहा महिन्यांनंतर जेव्हां दिवाळीच्या सुट्टींत घरीं जाण्याचा पहिला प्रसंग आला तेव्हां तर मनांतला कोपरान् कोपरा घरच्या ओढीनें भरून राहिला होता. आमच्या गांवापर्यंत सर्व्हिस मोटार जात नव्हती. जेथें मोटार थांबायची तेथून माझा गांव सात कोस दूर होता. म्हणून माझे वडील मला घेण्याकरितां बैलगाडी घेऊन आले होते. त्या दिवशीं तिसरा प्रहर झाला होता; आणि सात कोस मजल मारायची होती. हें बहुधा बैलांनींदेखील जाणल्यामुळें कीं काय, ते भरधांव निघाले. वडील मला म्हणाले कीं, घरीं माझी सर्वजण आतुरतेने वाट पहात आहेत. आपली कुणीतरी वाट पाहत आहे या जाणिवेनें तेव्हां मला फारच सुख वाटलें. खरोखर घरच्या माणसां-पासून कांहीं दिवस दूर राहून नंतर भेटायला येण्यांत अपूर्व गोडी आहे. घर जसजसें जवळ येऊं लागले, तसतशी वाटेवरची प्रत्येक ओळखीची खूण बोलकी झाली. त्या सर्व खुणांविषयीं एक नवीनच जिव्हाळा निर्माण झाला. त्या गुंगींत असतांना घर केव्हां आलें तें कळलें देखील नाहीं. दारांतच आई उभी होती. मी तिच्याकडे धावलों. ती भाकरी ओवाळून टाकते न टाकते तोच मी तिला बिलगलों.

आणि यापुढे जवळ जवळ एक तप जिव्हाळ्याच्या माणसांच्या सटींसामासीं होणाऱ्या भेटीचे सुख आणि विरहांतील हुरहुर भरती-ओहोटीप्रमाणे माझे जीवन व्यापून होती.

....यापुढे मात्र गांवांतच नोकरी मिळाल्याने ही भरती-ओहोटी देशोधडीला लागणार होती.

—आणि म्हणूनच मी अस्वस्थ झालो होतो.

* * *

# पंचांगांत नसलेली यात्रा

पुण्यक्षेत्राचा महिमा यात्रेच्या लोकपद्धीनें मोजला जात असल्यानें आणि नाशिक हें तर परम क्षेत्र, त्यामुळे इथे खंडोबाच्या यात्रेपासून एका तपानें भरणाऱ्या सिंहस्थ-यात्रेपर्यंत अनेक यात्रा 'लोकसंग्रह' करतात. सुक्याबरोबर ओल्याने जळावे तसे दारच्या लोकांबरोबर घरच्यांनाहि ह्या यात्रा 'सार्थ' घडतात. परंतु या धबडग्यांत घरचे लोक गुदमरतात. खरे म्हणजे घरच्यांसाठीं कांहीं खास घरगुती असावें कीं नाहीं? आणि म्हणूनच एक यात्रा खास घरच्या लोकांसाठीं भरते. मात्र व्यावहारिक 'अर्थ' या यात्रेला लागू पडत नाहीं. म्हणूनच सदर यात्रेत मेवामिठाईचीं दुकाने नसतात किंवा खेळण्यांचीं दुकानेहि नसतात. मात्र ह्या यात्रेत कमलावर 'अनंत हस्ते' 'जीवन' भरीत असल्यानें ही यात्रा खरीखुरी चैतन्यमय असते. इतकेंच नव्हे तर दारच्या लोकांनीं गर्दी करून त्या चैतन्याचा बाजार करूं नये, म्हणून ह्या यात्रेची तिथीदेखील

बाजारांत मिळणाऱ्या पंचांगांत दिलेली नसते. मात्र तिथि निश्चित नसली तरी 'नेमेंचि येणाऱ्या' पावसाळ्याबरोबर ही यात्राहि लवचिक नेमाने येते.

हवामानावरून पक्ष्यांनीं ऋतु ओळखावा त्याप्रमाणें घरचीं माणसें 'हवापाण्या'वरून ही यात्रा केव्हां भरणार ही गोष्ट ओळखतात. ती भरण्याच्या अगोदर एक-दीड दिवस सतत वर्षेचे धारानृत्य होतें. त्या धारानृत्याच्या पदन्यासावरून गांव मनांत उमजते कीं येणार! नदीला चांगलाच पूर येणार! आणि हा संकेत पूर्ण होतांच नदीकांठीं अनाहूत यात्रा भरते. ह्या यात्रेंत वरखालीं होणारे रहाट-गाडगें नसते, तरी वरून खालीं पडणारा धबधबा असतो. लांकडी हत्ती-घोडे यांची डोळ्यांना भोंवळ आणणारी चक्री नसली तरी ज्याकडे पाहूनच भोवळ यावी अशी भोवऱ्याची चक्री असते. पालांच्या दुकानांतून मिळणारे चहाचे पाणी नसले तरी पुराच्या पाण्यांतून चहाचा ओघ, चालू आहे असें वाटते आणि यात्रेकरितां स्नानाच्या वेळीं ब्राह्मणांनीं सांगितलेल्या मंत्रघोषाचा आवाज नसला, तरी पुराच्या खळखळाटाचा घनरव वृत्ति भारून टाकतो. खरें म्हणजे ह्या यात्रेचे यात्रेकरू म्हणून तुम्ही आलां कीं, दोन्ही डोळ्यांनीं सरितेचे नानाविध विभ्रम पांखराच्या वृत्तीनें टिपून घ्यायचे!

वास्तविक गांव तेथे नदी असेलच असे जरी नसले तरी नदी तेथें पूर असतोच! मात्र नदी तेथे पूर असूनहि पुरांच्या या 'उडदांमाजी' नाशिक येथील गोदावरीचा पूर पाहिल्यावर 'काळे-गोरें' निवडावें लागतें. हा पूर गंगा, सिंधु इत्यादि नद्यांच्या पुरांप्रमाणें वर्षांतून दोन वेळां येत नसला किंवा 'भयंकर' या विशेषणांत जरी तो उणा

असला तरी त्याचें अंगसौष्ठव इतके अनेकविध आहे कीं, पूर ओसरला तरी पुराची आठवण ओसरत नाहीं.

पुराने दुथडी भरून वाहणारी गोदावरी व्हिक्टोरिया पुलाखालून जात असतांनाच तिच्या अंतरंग-बहिरंगांत जमीन-अस्मानाचा फरक पडतो. आतांपर्यंत गंभीर व सौम्य मुद्रा असलेली गोदावरी भाव-बंधनांतील मालतीप्रमाणे दिसते. परंतु पुलाच्या चरणांचा तिच्या 'जीवनां'त प्रवेश होतांच तिचा 'जीवनौघ' जादूची कांडी स्पर्शावी तद्वत् पालटतो आणि मालतीचे खेळकर लतिकेत रूपांतर होऊन तिचा अल्लडपणा अंगप्रत्यंगांतून उल्लासित होऊन वर उफाळून येतो. सूर मारून तळाशीं जावे आणि क्षणार्धांत उफाळून वर यावें, त्याप्रमाणे पुलाच्या सांडव्यावरून केळीच्या खांबाप्रमाणें तकतकीत अंगाचा जलौघ सफाईनें खालीं सूर मारतो आणि दुसऱ्याच क्षणीं तोंड वळवून पुलाच्या दिशेनें खळखळ करीत उसळून येतो. त्या वेळीं त्याला जणूं काय खट्याळपणाचें कारंजें फुटते; खदखदणाऱ्या हास्याचा शुभ्र फेस येतो. प्रवाहाच्या उलट्या दिशेने उफाळण्याचा हा बेत नंतर बदलतो, आणि स्वत:भोंवतीं चार-पांच गिरक्या घेऊन तो गांधी तलावाच्या दिशेनें झेपावत जातो. तोंच त्याला समोर गांधीजींची पवित्र स्मारक-ज्योत दिसते. त्या स्थितप्रज्ञ ज्योतीला अभिवादन करण्याकरितां तो प्रवाह आपले लाटांचे हात उंचावून जलतुषारांचे मौक्तिक तिच्या चरणीं अर्पण करतो आणि नंतर मंदिराला फेरी घातल्यागत डावीकडून तो रामकुंडांत प्रवेशतो. तलावाच्या एका टोकाला महात्माजींची स्मारक-ज्योत तर दुसऱ्या टोकाला देवमामलेदार यशवंतराव महाराजांचें मंदिर!

चहूंबाजूंनीं वेढलेल्या पुराच्या पाण्यांत तें मंदिर ' कर कटेवरीं ' ठेवलेल्या पांडुरंगाप्रमाणें दिसते. या दोन पुरुषोत्तमांना वंदन केल्यावर पूर्वाभिमुख असलेला तो प्रवाह रामकुंडांतून दक्षिणाभिमुख होऊन वाहूं लागतो. दक्षिणोत्तर असलेलीं घाटावरचीं छोटीं छोटीं मंदिरें तर केव्हांच त्याच्या जलपंखांत शिरलीं आहेत आणि तो दोन पुरुष उंचीचा सिमेंट कॉंक्रीटचा बलभीमहि रामकुंडांतून येणाऱ्या त्या पवित्र प्रवाहांत बुडाला !

व्हिक्टोरिया पुलावरून पुराच्या विश्वरूपदर्शनाचा एवढाच भाग ठळकपणें दिसतो. तसें बघायचेंच म्हटलें म्हणजे नारो शंकराच्या मंदिरापर्यंतचा भागहि दिसतो, परंतु तें दृश्य बघण्याची खरी मौज कोटावरूनच ! प्रवाहाला समांतर असलेला हा दक्षिणोत्तर कोट नाशकांतील नदीकांठच्या घरांना आपल्या खांद्यावर घेऊन संरक्षितो आहे. इतका वेळ आपण पुलावर मध्यभागीं उभें राहून पुराचा जलोत्सव पाहत होतो. कोटावरून पहावयाचें म्हणजे एक प्रकारें नदीच्या तटावरून बघण्यासारखे होते. मात्र तादात्म्यावरून ताटस्थ्यावर जरी आलो तरी पूर बघण्याच्या आनंदांत थेंबभरहि उणेपणा नाहीं. वाङ्मयानंद हा ताटस्थ्यानें होतो कीं तादात्म्याने होतो, याबाबत जरी मतभिन्नता असली तरी पूर पाहण्याचा आनंद हा जसा तादात्म्यांत आहे तसाच ताटस्थ्यांतहि आहे यांत मात्र मतैक्य आहे. नव्हे, दोन्ही ठिकाणांहून पूर पाहिल्याशिवाय पूर-यात्रेची पूर्तताच होत नाहीं आणि म्हणूनच पुलावरच्या लोकांचा मेळावा कोटाकडे व कोटाकडचा मेळावा पुलाकडे वळत असतो. कोटावरून बघावें तो पंचवटीच्या भाजीपटांगणांत पूर ऐसपैस

पसरला असून तेथील धर्मशाळांच्या पहिल्या मजल्यांत त्याने पाहुणे-पणानें प्रवेश केला आहे. दोन्ही तीरांवरील गल्लीबोळांतून आगंतुक-पणें शिरलेल्या पुराची शोभा खाडीसारखी दिसत आहे. वास्तविक दोन्ही तीरांवर गांवाची वस्ती असलेल्या पुष्कळ नद्या आहेत. परंतु अगदीं ताटावर बसल्यागत दोन्ही तीरांवर घरे असलेली फक्त नाशिक-पंचवटी येथील गोदावरीच होय! ह्या इथल्या प्रवाहाचें आणखी एक वैशिष्ट्य आहे : नदीच्या कांठावर असलेलीं देवळे पूर आला म्हणजे ऐन नदीप्रवाहांत दिसूं लागतात. त्यांच्या चहूं बाजूंनीं खेळणारे पुराचे पाणी पाहिल्यावर जलदुर्गांची स्मृति होते. एका देवळाची रचना मुळीं पूर आला म्हणजे ते मंदिर पुराच्या पाण्यानें वेढलें जावें ह्या हेतूनेच केलेली आहे. हें मंदिर मुके म्हणजे चारहि बाजूंकडून बंद आहे. मात्र चारहि भिंतींना पुरुषभर उंचीची संगम-वरी जाळी बसवलेली असून खालीं चारहि बाजूंना एकेक सिंहमुख आहे. पुराचे पाणी आले म्हणजे सगमरवरी जाळींतून मंदिरांत जातें. आंत असलेल्या समाधीला स्नान घालून नतर ते पाणी सिंहमुखांतून बाहेर पडतें.

प्रवाहांतल्या या मंदिरांचा सहवास पुराच्या पाण्याला सोडावासा वाटत नाहीं म्हणून कीं काय, ते पाणी किंचित् पुढें जाऊन पुन्हां मंदिराकडे मागें वळते, तेथेच जरा घुटमळतें, आणि मग नाइलाजानें पुढे सरतें. पाणी चढतां चढतां थेट कोटावरहि आले म्हणायचें! आणि आतां तर एका प्रचंड लाटेने कोटावर पाणीच पाणी झालें. जणूं कांहीं कोटावर उभ्या असलेल्या असंख्य रसिकपुंडलिकांभेटीं पुराच्या पाण्याचे हें परब्रह्म आलें! परंतु परब्रह्म असलें म्हणून काय

झाले ? परब्रह्माला आपले पाय लागूं नयेत म्हणून ते रसिक झटकन् मागें सरले. एवढेच नव्हे तर उलट त्यांनींच त्या पूरब्रह्माचें तीर्थ माथीं घेतले, तोंच नेमक्या ह्याच क्षणीं नदींतून घनगंभीर घंटारव कानीं आला. सगळ्यांनीं उत्सुकतेनें त्या दिशेने पाहिलें. समोरच्या नारो शंकराच्या घंटेला लाटांनीं चुंबिले होते. भाविक जन म्हणूं लागले कीं, आतां पूर ओसरणार ! आणि खरेच ! थोड्याच अवधींत श्रीकृष्णाच्या करंगळीचा स्पर्श होतांच यमुनेनें ओसरावें तद्वत् पुराचें पाणी ओसरूं लागले.

पुराच्या पाण्याचे हे बारीक-सारीक विभ्रम टिपायला सारें गांव लोटले होते. नदीच्या दोन्ही तीरांवर यात्रा भरली होती. निसर्ग आणि माणूस यांच्यांत दृष्टीने नातें जमले होते. लौकिक यात्रेतील श्रीमंत-गरीब, उच्च-नीच हा भेद तेथे विरघळून गेला होता. त्यांच्यांतला माणूस फक्त शिल्लक राहिला होता. खरे म्हणजे ते सर्व केव्हांच लौकिकाच्या पल्याड असलेल्या अलौकिकाच्या गांवीं पोहोचले होते. त्या गांवीं होते फक्त निसर्गाचे काव्य पाहणारे बदामी डोळे !

* * *

# अ(न)पेक्षित आक्रोश

तूं जेव्हां अखेरचा श्वास घेऊन प्राण सोडलास, तेव्हां माझ्या अंतरींच्या सप्त-पाताळांत दडी देऊन बसलेली विव्हलता विलाप करीत वर उसळून आली आणि एक अस्फुट हुंदका माझ्या तोंडून बाहेर पडला.

वास्तविक ह्या अस्फुट हुंदक्याच्या स्वरूपांतदेखील तुझ्या मृत्यूचें दु:ख होणार नव्हतें—नव्हे, व्हायला नको होतें.

कारण हा तुझा मृत्यु तसा मुळींच अनपेक्षित नव्हता. उलट आम्ही जणूं त्याची प्रतीक्षाच करीत होतों. अर्ध्या तपापूर्वी जेव्हां त्या मृत्यूने कॅन्सरच्या रूपानें सूक्ष्म परंतु अटळ पदक्षेप केला, तेव्हांच आम्हीं आमचा पराजय कबूल केला होता. तेव्हांपासून प्रत्येक क्षणाक्षणाला तो तुझ्या देहावर अधिकाधिक आक्रमण करीत येत होता. त्याच्या त्या क्रूर आक्रमणानें तुला होणाऱ्या यातना पाहून आमचा जीव तीळ तीळ तुटत असे. परंतु पुढें पुढें त्या यातना पाहून पाहून आमच्यांतील करुणा निढावली. त्या

निर्ढावलेल्या अवस्थेतच ' तुझ्या ह्या यातना जर संपणार नसतील तर तूं तरी एकदांची संपून जा; म्हणजे तरी तुझी त्या यातनांपासून सुटका होईल ' असा उफराट्या काळजाचा विचारदेखील माझ्या मनांत घोळूं लागला होता. कारण मृत्यूशीं चाललेल्या ह्या झटापटींत क्षणाक्षणाला त्याचाच विजय होत होता.

साहजिकच मरणाच्या दिशेनें वेगानें पडणारीं तुझीं पावलें आम्ही रोखूं शकणार नाहीं, याचा आम्हांला हतबल करणारा प्रत्यय केंव्हांच येऊन चुकला होता. मरणाकडे जाणाऱ्या तुझ्या पावलांना असहायतेनें साक्षी राहणे एवढेंच आमच्या हातीं राहिलें होतें. यमधर्माने फेकलेल्या कॅन्सरच्या जीवघेण्या जाळ्यांत तूं प्रतिदिनीं अधिकाधिक गुरफटत आहेस, हे उघड्या डोळ्यांनीं बघण्याखेरीज दुसरा उपचार राहिला नव्हता. तें जाळें तटातटा तोडून तुला आमच्यांत परत आणावी, ही इच्छा कायमची वांझ ठरली होती.

सुरवाती-सुरवातीला ही असहायतेची जाणीव मनाला जाळीत असे. परंतु नंतर नंतर जळण्यासारखे असे कांहीं मजजवळ उरलें नाहीं. त्यामुळें असहायतेच्या ज्वालांतील तप्तता जाणवेनाशी झाली आणि त्या थंड-पणांतच ' तूं नक्की जाणार ' ह्या प्रत्ययाचा चेक आम्हीं नाइला-जानें वटवून घेतला. त्या प्रत्ययाच्या प्रकाशांतच आम्ही एका वेगळ्या अर्थानें भयाण निर्विकारपणे तुझ्याकडे पाहण्याचा प्रयत्न करूं लागलों. आतां ' मरण हीच तुझी प्रकृति ' ह्या वेदान्ती जाणिवेनें आम्ही नित्याचे व्यवहार उपसूं लागलों. रात्रीं जरी बऱ्याच उशीरां-पर्यंत मी तुझ्या उशाशीं जागत बसत असलो, तरी सकाळीं उसन्या का होईना परंतु उल्हासानें कॉलेजमध्यें जाऊं लागलों. तेथें गेल्यावर

कुणीं मित्राने तुझ्या प्रकृतीविषयीं नित्याचे प्रश्न विचारले म्हणजे मी 'सुखदु:खे समे कृत्वा' त्या गुळगुळीत प्रश्नांना कालचींच सपाट उत्तरे देऊं लागलो. एखादें विशेषण कमी अथवा जास्त. सरावानें पुढें पुढे मी चौकशीच्या चौकींतून यांत्रिकतेने बाहेर निसटूं लागलो. परंतु मधूनच केव्हां तरी 'तूं खरेच जाणार तर—' च्या हुरहुरीच्या 'काळी चार' वर विकल जाणिवेचे बोट ठेवले गेले म्हणजे माझ्या अंत:-करणांत केवढी तरी पोकळी निर्माण होई! त्या पोकळींतून उमटूं पाहणारा हुंदका आतां सारे गगन व्यापतो कीं काय, असे वाटत असे. परंतु दुसऱ्याच क्षणीं अन्य विषयांवरील चर्चेच्या उथळ खळखळाटांत तो हुंदका गुदमरून जाई.

कणाकणाने झिजल्यामुळे तुला होणाऱ्या त्या असह्य कायिक, तशाच मानसिक यातना व 'तूं गेलीस तर—' ची भयाण जाणीव ह्यांचे दु:ख मला कधींच झालें नाहीं, असे मात्र नव्हे! परंतु दु:खाची ती धारदार कुठार रोज घाव घालून घालून बोथट झाली होती. रोजच्या स्पर्शाने तिची दाहकता शमली होती. क्षणाक्षणाला वर्धमान होणाऱ्या तुझ्या शरीरांतील मृत्यूच्या अतिपरिचयानें त्याची अपरिहार्यता पटवून घ्यावी लागत होती. त्या अपरिहार्यतेच्या आधारावर तो जणूं कुटुंबांतील एक सदस्य झाला होता. पाहुणेपणांतील परके-पणाची कात त्याने केव्हाच टाकून दिली होती. त्याची ती क्रूर आक्रमणशीलता बघून मी मनांत म्हणत असे— "तो अटळ आहे, तो अटळ आहे!"

त्यामुळे जरी मी वैद्यकीय उपचारांची कांस सोडली नव्हती, तरी त्या उपचारांनीं तुझी त्याच्यापासून सुटका होईल, अशी खोटी

आशा मात्र बाळगली नाहीं. ही स्थिति केवळ माझ्या एकट्याचीच नव्हे तर घरांतील सगळ्यांचीच झाली होती. साहजिकच तुझ्या अंथरुणांतील मृत्यूला न बिचकतां तुझ्या खोलींत कधीं ब्रिजचा डाव रंगायचा तर कधीं काव्यशास्त्र-विनोद फुलायचा. लहानगी मंजू तर तुझ्या शेजारीं बसूनच परवच्याचे जिने धाडधाड चढून जात असे. त्या अनेकविध ऐहिक सुखांच्या कलकलाटांत मृत्यूची सुतकी गंभीरता अंथरुणांतच अंग चोरून बसली होती. कधीं कधीं तुझ्या उशा-शेजारच्या ताज्या टवटवीत फळांकडे दृष्टि गेली म्हणजे ह्या ताज्या रसरसलेल्या फळांच्या कांतीप्रमाणेच तुझ्या चेहऱ्यावर एके दिवशीं तजेला येईल, अशी लोभस आशा मनांत येई. परंतु दुसऱ्याच क्षणीं कॅन्सरची ती सर्वभक्षक प्रकृति तक्षकासारखी त्या कोवळ्या आशेला निर्दय डंख मारी आणि मग एका विषण्ण छायेने माझे मन झांकोळून जाई; अंतरांतील सगळ्या कोमल वृत्ति करपून जात व मनाला एका भकास माळाचे अपरूप प्राप्त होई.

पुढे पुढें ती भकासताहि माझें रूपच झाली. त्यामुळे त्यांतील कटुता शेवाळली. मग त्या शेवाळलेल्या मनाच्या दिग्दर्शनाखालीं माझ्या शरीराची यंत्रणा व्यवस्थित सुरू होई.

तूं गेल्यानंतर कोणत्याहि प्रकारचे दुःख आम्हांला होऊं नये म्हणूनच कीं काय त्या कराल मृत्यूने अखेरीअखेरीस नवीं नवीं अस्त्रें तुझ्या शरीरावर फेकून दुःखाचीं अंगप्रत्यंगे आम्हांला उलगडून दाखवायला सुरवात केली.

ज्या वाणीमुळे तुझ्या हृदयाशीं मी संवादी राहूं शकत होतों त्या वाणीवरच मृत्यूनें एके दिवशीं घाला घातला आणि तुझी बोलण्याची शक्ति हळूहळू क्षीण होऊं लागली. त्या वेळीं मीं मनांतल्या मनांत

किती आक्रंदन केले म्हणून सांगूं ! छे ! छे ! यापेक्षां तो पाषाण-हृदयी मृत्यु तुला एकदमच कां नेत नाहीं, असा विचार माझ्या मनांत तरळून गेला. परंतु दुसऱ्याच क्षणीं मीं त्या आततायी विचाराला दाबले. कारण अजून तूं माझ्या हांकेला 'ओ' द्यायचीस. मला क्षीण स्वरांत कां होईना परंतु आतुर हांक मारायचीस आणि त्याहिपेक्षां अधिक महत्त्वाचें म्हणजे तूं तुझ्या त्या निरागस नेत्रांतून माझ्यावर प्रेमवर्षाव करायचीस. त्या एकाच दृष्टिक्षेपांत मला तुझ्या स्नेहाळ अंतःकरणाच्या अस्तित्वाची ओळख पटायची.

परंतु अखेरच्या पंधरा दिवसांत तर तोहि ठेवा हरपला. तुझ्या शरीरांत वस्तीस असलेल्या पंचमहाभूतांपैकीं तेज ह्या महाभूतानें डोळ्यांच्या दरवाजांतून प्रयाण केलें. आजपर्यंत त्या दृष्टितेजानें तुझ्या आत्म्याचे दर्शन घडविण्याची कामगिरी उचलली होती. त्यानेंच जेव्हां असा अंगचोरपणा केला, तेव्हां तुझे डोळे उघडे असूनहि दृष्टीचा भाव मात्र त्यांत राहिला नाहीं. त्या वेळीं मी 'तूं कोठें आहेस ?' असा मूक आक्रोश करूं लागलों. तुझ्या त्या निर्विकार दृष्टीकडे पाहिल्यावर वाटे कीं, आतां खरेंच तूं हा पंजर सोडून गेलीस ! देह जिवन्त असूनहि 'तूं' मात्र तेथें नव्हतीस. किती विचित्र जाणीव होती ती ! परंतु तरीहि लौकिक दृष्ट्या अजून तूं होतीस. इतके दिवस ज्या तुझ्या हातानें तूं माझ्या पाठीवरून मायेनें हात फिरविलास, त्याच हाताकडे आतां पाहवत नव्हतें. तरीहि तो हात अजून 'तुझाच' आहे, याची जाणीव जीव धरून होती.

या नाहीं त्या प्रकारानें तूं गेल्यानंतर जें दाहक दुःख होणार होते, त्या दुःखाचे सर्व प्रकार तूं जाण्याच्या अगोदर अनुभवाला

येऊन चुकले. त्यांतील अनुभूतीहि निबर झाली. त्यामुळे जणूं कांहीं तुझे शारीरिक मरण आतां आम्ही प्रशांत आत्म्याने सहन करणार होतों. आणि खरेच, ह्या विचाराने मी तोंडावर स्थितप्रज्ञता फांसून चारचौघांत राजरोसपणें हिंडूं लागलो. सराइताप्रमाणे लोकांमध्यें जाऊन हास्यविनोदाचे मुखवटे घालूं लागलो. त्या मुखवट्यांचा कांच जाणवेनासा झाला. कारण कणाकणाने झालेल्या आजपर्यंतच्या दुःखाने माझें संवेदनाक्षम अतःकरण खरेच बधिर भासूं लागले होतें. जणू कांहीं तुझा हा उरला-सुरला देह गेल्यावर स्फुंदूनस्फुदून रडावे, असले कोठलेहि स्पंदन आतां त्या बधिर हृदयांत होणार नव्हतें. आणि म्हणूनच 'तूं आज ना उद्यां जाणार' ह्या आध्यात्मिक तटस्थतेने मी तुझ्या त्या शरीराकडे पाहूं लागलों.

प्रत्यक्षांत तूं जेव्हां खरेंच गेलीस तेव्हां मात्र हें सारें तत्त्वज्ञान मेणाच्या घराप्रमाणे वितळून गेलें. धुगधुगत्या स्वरूपांत का होईना जी तूं होतीस तीहि आतां उरली नाहींस, ह्या एकाच जाणिवेनें माझें मन उमसून उमसून आक्रंदूं लागले. तुझ्या त्या जाण्यानें ह्या भरल्या विश्वांत क्षणांत पोकळी निर्माण झाली आणि मी त्यांत पोरकेपणाच्या व्यथेनें जळूं लागलो. भर दुपारीं प्रकाशाला अचानक भोंवळ येऊन जिकडे तिकडे अंधाराचें साम्राज्य माजलें आणि मी त्यांत कुणाच्या तरी आधारास्तव चांचपडूं लागलों. फुललेल्या प्रसन्नतेला मरगळ येऊन एक विषण्ण अवकळा सृष्टीवर लाव्हारसाप्रमाणें पसरूं लागली. 'तूं जाणारच' हा पाठ केलेला धडा मी क्षणार्धांत विसरलो 'आणि तूं अशी गेलीस तरी कोठें?' ह्या एकाच मंत्राचा विकल रवानें घोष करूं लागलों.

आजवरच्या आचारविचारांनीं हा आक्रोश अगदींच अनपेक्षित ठरत होता. त्या आचारविचारांतून उद्‌भवलेल्या तत्त्वज्ञानाशीं हें विकल आक्रंदन विसंवादी होत होतें. परंतु तसें तरी कसें म्हणावें ? कारण जें पटलें होते ते बुद्धीला, भावनेला नव्हे ! म्हणून जरी हा आक्रोश अनपेक्षित असला तरी तो तर्काला–प्रेमाला नव्हे ! उलट तो आक्रोश हृदयाच्या भावविश्वाशीं पूर्णपणें सुसंवादीच होता.

विश्वाचे संपूर्ण रहस्य उमजलेल्या योगी निवृत्तिनाथांनीं ज्ञानेश्वरांच्या समाधिप्रसर्गी असेच अ(न)पेक्षित अश्रुविमोचन केलें न्हव्हतें काय ?

* * *

# जेव्हां मोठे लहान होतात....

दोन दिवसांचें पाहुणेपण संपल्यावर मी परत निघालो. वडील माणसांचा निरोप घेतांना औपचारिकपणाची परीटघडी बरीचशी टिकून होती. परंतु लहान मुलांचा निरोप घेतांना अंतःकरणांत कालवाकालव झाली. त्यांच्या सहवासाची स्निग्धता तरळत असतांनाच विरहाची व्याकुळता दाटूं लागली. निरोपाचा 'येतों' हा शब्द उच्चारण्याइतकाहि उपचाराचा परकेपणा न राहिल्याने मीं केवळ सांद्र स्मिताने त्यांचा निरोप घेतला. तोच औपचारिकपणा चोंबडेपणानें म्हणाला : 'निघतांना लहान मुलांना खाऊला पैसे द्यायची एक रीत असते !" नकळत माझा हात यांत्रिकतेनें खिशांत गेला. परंतु दुसऱ्याच क्षणीं कांहीं एका कृतज्ञ भावनेनें उरल्यासुरल्या उपचाराचें बंधन झुगारून पैसे न काढतांच रिक्त हात बाहेर आला. आणि मी तसाच चालूं लागलों.

असें करण्यांत मी लहानपणीं पाहुण्यांच्या निमित्तानें अनुभवलेल्या आनंदाशीं खचितच कृतघ्नपणा करीत होतों—

लहानपणीं शाळेला सुटी मिळण्याची जीं अनेक निमित्तें असत, त्यांत ‘ पाहुणे ’ ह्या निमित्ताला माझ्या दृष्टीने फार मोठें महत्त्व होतें. पाहुणे आले म्हणजे सुटी मिळते ह्या घवघवीत फायद्यामुळें रोज शाळेत पाठविणाऱ्या आई-वडिलांपेक्षां मला पाहुणेच आवडत. घरचीं माणसे ‘ पाहुणे ’ ह्या विषयावर कधीं कधीं प्रतिकूल बोलत त्या वेळीं तर मला त्या बिचाऱ्या पाहुण्यांबद्दल फारच सहानुभूति वाटत असे ! प्रारंभीं प्रारंभीं फक्त सुटी देण्याच्या सामर्थ्याचे वलयच पाहुण्यांभोवतीं आहे, अशी माझी समजूत होती. परंतु नंतर वाढत्या वयाबरोबर मला पैशांची किमया समजूं लागली. आणि पाहुण्यांना शैक्षणिक अर्थाबरोबरच व्यावहारिक ‘अर्थ’ हि असतो, याचा प्रत्यय आला ! एका दिडकींत खिसा भरून फुटाणे येतात हा शोध अंगवळणीं पडला. पाहुण्यांकडून मिळालेले पैसे आईच्या बँकेंत सांठवून वेळीं-अवेळीं मी तिच्याकडे शिलकेबाबत विचारपूस करूं लागलों. एकदां माझ्या ठेवींतले पैसे मला न विचारतां वापरले म्हणून मी तिच्याविरुद्ध बाबांकडे फिर्यादसुद्धां केली. पाहुण्यांच्या ह्या आर्थिक गुणावर मी इतका लुब्ध होतो कीं, घरांतील माणसें एका अर्थानें तर मी दुसऱ्या अर्थाने पाहुण्यांच्या जाण्याच्या वेळेची प्रतीक्षा मोठ्या आतुरतेनें करीत असें ! जातांना ते ज्या अर्थीं मलाच पैसे देतात आणि ज्या वडील माणसांनीं त्यांचें एवढे आदरातिथ्य केलें त्यांना एक दिडकीसुद्धां देत नाहींत, त्या अर्थीं मी कुणीतरी मोठा माणूस असलों पाहिजे, असा दाट संशय येई.

मात्र मी जसजसा मोठा होऊं लागलों, तसतसा माझ्यांतला मोठेपणा पाहुण्यांना दिसेनासा झाला कीं काय कोण जाणे ! कारण

माझ्या लहान भावंडांना पैसे मिळत त्या वेळीं कधीं कधीं मला वगळण्यांत येऊं लागले! तेव्हां मात्र मी मोठा होत चालल्याबद्दल मला फारच वाईट वाटूं लागलें. मी देव्हाऱ्यांतील देवाला पुष्कळदां विनविलें कीं, 'देवा, मला मोठा करून पाहुण्यांना दिसणारा माझ्यांतील मोठेपणा नाहींसा करूं नकोस!' परंतु नैवेद्याप्रमाणेच ह्याहि विनवणीची दाद लागली नसावी. त्यामुळे मला माझ्या इच्छे-विरुद्ध मोठें व्हावें लागले.

हा अनुभव जमेस असल्यानें जेव्हां मला पाहुणा म्हणून एके ठिकाणीं जाण्याचा पहिला प्रसंग आला तेव्हां सुटी देण्याचे व दामाजींचें अशीं दोन सामर्थ्यें माझ्या अंगीं वसतीस आल्यानें मी खुषींत आलो.

प्रत्यक्ष पाहुणा म्हणून हजर झाल्यावर मला आढळून आलें कीं, तो दिवस नेमका सुटीचा निघाला. माझे पहिलें सामर्थ्य असे वापरल्याशिवाय निर्माल्य झालेलें पाहून माझ्या मोठेपणाचा थोडासा हिरमोड झाला. म्हटले, याचे उट्टें जाण्याच्या वेळीं दामाजीचा अवतार दर्शवून मोठेपणाची प्रौढी मिरविण्यांत भरून काढूं!

बाबालोकांनीं जरी प्रथमच माझ्या अंगावरची मोठेपणाची झूल वरील रीतीनें काढून घेतली तरी त्या अपराधाचे प्रायश्चित्त म्हणून कीं काय घरच्या वडील मंडळींनीं माझ्या अंगावर औपचारिक मोठे-पणाचीं वस्त्रें तत्परतेनें चढविलीं. मी आतां एम्. ए. ला आहे, हे ऐकून 'अरे वा!'चा कौतुकोद्गार काढला तेव्हांच आमचा देहरथ जमिनीपासून दोन अंगुळें वर उचलला गेला. तशांत मी नोकरीचा घाणा ओढून अभ्यासाचा 'अबब' करायला लावणारा प्रचंड व्याप उपशीत आहें, हें ऐकल्यावर त्यांच्या चेहऱ्यावर

उमटलेल्या ' अग बाई ! ' च्या आश्चर्याभिनयानें माझ्या मोठेपणाच्या हौसेला लांबलचक ढेकर आली !

मोठेपणाला हपापलेल्या माझ्या वृत्तींना ह्या शाब्दिक उपचारांच्या सोहळ्यांत मुलांना सुटी देणाऱ्या मोठेपणाच्या अभावाचें शल्य खुपेनासे झाले. इतकेच नव्हे तर त्या कैफांत मी लहान मुलांना विसरूनदेखील गेलो. दुपारीं जेवण झाल्यावर मठ्ठयाची चव तोंडांत घोळवीत मी बैठकीवर सैलपणे लोळत पडलो. घरांतलीं यजमान मंडळी मला विश्रांति देण्याकरितां घरांत गायब झालीं. घरांत दोन प्रहरची सुस्त शांतता आळस देत पसरली. नेमकी हीच वेळ साधून घरांतील बालगोपालांनीं दबकत दबकत दिवाणखान्यांत प्रवेश केला. त्या त्रिकुटामध्ये एक सात-आठ वर्षाचा मुलगा व त्याच्या वयाच्या दोन्ही अंगांना समास सोडलेल्या वयाच्या दोन मुली होत्या. दिवाणखान्यांत रेंगाळणारीं त्यांचीं पावले मला पाहतांच ओसरीकडे वळूं लागलीं ! छे ! छे ! हा तर सरळ सरळ माझा अपमान होता. एवढा मोठा माणूस तेथे हजर असतांना त्याच्याकडे दुर्लक्ष करून ही मंडळी पुढे जाते ह्याचा अर्थ काय ? नाहीं, कौतुकाची विचारपूस तर नाहीं; परंतु निदान कौतुकाने तरी त्यांनीं माझ्याकडे बघायला काय हरकत होती ? अगदीं अज्ञजन म्हणून सोडून दिलें तरी मी त्यांना जातांना खाऊला पैसे देणार होतो, त्या दूरदृष्टीनें तरी त्यांनीं माझ्या मोठेपणाला मुजरा करायला हवा होता ! म्हटलें, त्यांना अगोदर आपल्या मोठेपणाचे विश्वरूपदर्शन घडवूं म्हणजे तीं मुलें आपोआपच मला मान देतील. ह्या उद्देशाने मीं त्यांना ' शुक् शुक् ' करून आमंत्रण दिलें.

माझ्या आमंत्रणाचा स्वीकार करावा कीं न करावा, या संभ्रमांत तीं मुलें क्षण दोन क्षण घुटमळलीं आणि मग हळूंहळूं माझ्याकडे येऊं लागलीं. मी मनांतल्या मनांत म्हणालों कीं, याचे नांव मोठेपणा! उगाच नाहीं नुसत्या 'शुक् शुक्' वर तीं मुले इकडे वळलीं!

तीं मुले जवळ आल्यावर मात्र पंचाईत आली. यांना माझा मोठे-पणा दाखवायचा म्हणजे काय करावे, ते मला नीट समजेना! बरें, त्यांच्यासारखेच क्षुल्लक विषयावर बोलावे तर मग मोठेपणाला काय अर्थ उरला? माझा मोठेपणा याप्रमाणे लक्ष्मणरेषेसारखा आमच्यांत बोलण्याचालण्याचे दळणवळण घडूं देईना. अखेर त्यांची निरागसता मला इतकी मोहक वाटली कीं, मी मोठेपणाची लक्ष्मणरेषा ओलांडून त्यांच्या लहानपणाला जाऊन मिळालों. प्रवेश करतांना परवलीचा शब्द म्हणून मीं त्यांना लबाड कोल्ह्याची गोष्ट सांगितली. त्या गोष्टींतील लबाड कोल्ह्याच्या फजितीला ती मुले जेव्हां खळखळून हंसलीं तेव्हां त्या हंसण्याच्या खळखळाटांत मीं माझ्या मोठेपणाच्या चाकोरींत आक्रसलेल्या वृत्ति उल्हसित केल्या. त्या उल्हसलेल्या वृत्तिपंखांनी पंचविसाव्या वर्षावरून घूमजाव केला आणि मी मुलांना समेवर येऊन मिळालों. तेव्हां मनाचे हौद उल्हासाने भरून वाहूं लागले. साहजिकच त्यांनीं सांगितलेल्या लहानसहान गमती रसानें थबथबलेल्या वाटल्या. त्या रसमय अवस्थेत जेव्हां आम्ही सर्वजण बाहेर फिरायला निघालो तेव्हां दुपारचें ऊन चांदणे होऊन सामोरें आलें. त्यांच्या घरापासून जवळच धरण होतें. तें धरण दाखवायला त्यांनीं मला नेलें. वाटेंत रस्त्यावरच्या वेड्या बाभळीची ओळख करून दिली. त्यांच्या बाहुलाबाहुलीचें लग्न ज्या आंब्याच्या झाडा-

ख़ालीं होते, ते झाड दाखविलें. दुरून दिसणारी धरणाच्या
ध्यभागींची डोलकाठी गुळगुळीत डोक्यावरच्या शेंडीसारखी दिसते
कीं नाहीं म्हणून प्रश्न अशा लाडिकपणांत विचारला कीं, मी ' अरे
ा, खरंच कीं ! ' म्हणूनच उद्गारलो. कांठावर गेल्यावर भाकऱ्यांचा
खेळ खेळलो. त्या खेळाने पोट भरल्यावर पाण्यांत पाय सोडून बसलों.

नंतर दिवसभरांत व दुसऱ्या दिवशींहि आम्हांला परस्परांचा
ळा लागला. ' परस्परांचा परस्परांना ' असें म्हणण्यापेक्षां मलाच
यांचा लागला म्हणणे वास्तव ठरेल ! त्या ळळ्यानें मी माझे पाहुणे-
ण हरपून बसलो. अहंकारानें घातलेलीं उपचारांचीं कोळिष्टके झडून
लीं आणि कोंडलेल्या निर्भर भावना झुळूझुळू वाहूं लागल्या. मन-
ोकळ्या हास्याचीं कारंजीं उसळलीं. उपचारांच्या घट्टयांनीं निबर
ालेल्या चेहऱ्यावर संवेदनाचे विभ्रम पदन्यास करूं लागले. डोळ्यांनीं
भीरतेची कात टाकली. त्यांत कोमल व लुसलुशीत भाव तरळूं
ागले. जिकडे तिकडे एका अनामिक प्रसन्नतेचे मळे मोहरून आले.

अशा अनुभूतीशीं कृतज्ञ राहण्याकरितांच मीं खाऊला पैसे
ण्याच्या उपचाराचें बंधन पाळलें नाहीं. तें उपचार-बंधन पाळणें
्हणजे मीं पुन्हा पाहुणेपणाचा मुखवटा धारण करणें होय. परंतु
ाहुणेपण तर केव्हांच देशोधडीला लागलें होतें. हें सर्व आचरण
दाचित् लहानपणीं अनुभवलेल्या आनंदाशीं कृतघ्नपणाचें असेल;
ंतु ती कृतघ्नता विधायक होती. त्यामुळे नव्या चैतन्यदायी
नुभूतीशीं कृतज्ञता ठेवली जात होती. मी जर मोठा राहूनच परत
ाघालो असतो तर कदाचित् तें उपचाराचें ओझे डोक्यावर बाळगलें
सतें. परतु मी आतां लहान झालों होतों....

* * *

# नवी शाळा

अस्ताव्यस्त सामानाची व्यवस्थित बांधाबांध करीत असतांनाच माझा मित्र नारदमुनी-सारखा हजर झाला. एकंदर रागरंग ओळखूनहि त्यानें मला संथपणें प्राथमिक स्वरूपाचाच प्रश्न विचारला : 'कुठं निघालास ?'

'प्रवासाला—'

'प्रवासाला ? कशाकरितां ?'

'सहज !'

'सहज ?'

झालें ! ज्या प्रकाराला मी भीत होतों तो प्रकार अखेर घडलाच ! माझी अशी इच्छा होती कीं, माझ्या प्रस्तुत प्रवासाची इतरांनीं कारणपरंपरा शोधूं नये. मला माहीत आहे कीं, प्रवासाला कांहीं तरी कारण हवे असतें. बदलत्या ऋतुमानाप्रमाणे आणि निर्माण होणाऱ्या कौटुंबिक गरजांप्रमाणें हीं कारणें अनेकविध असूं शकतात. वासंतिक ऋतूंत न झेपणाऱ्या अहेराची फी देऊन कुणाच्या तरी लग्नांत

स्वतःची आबाळ करून घ्यायला, वर्षाऋतूंत पंढरीनाथाच्या भेटीकरितां चंद्रभागेच्या कांठीं पावसांत भिजायला किंवा शरदृऋतूंत सासुर-वाडीला जाऊन काकासाहेब गाडगीळांच्या तिखटमिठाच्या करंज्या-पुऱ्या खाऊन जठराग्नि शमवायला माणसे स्वतःच्या गांवाहून दुज्या गावाला जातात.

वयोमानाप्रमाणे प्रवास-कारणांत फरक पडतो. बालवयांतील सहलीपासून तो उतारवयांतील काशीयात्रांपर्यंत अनेक कारणें माणसाच्या प्रवासी वृत्तीला साद घालीत असतात. परंतु दर वेळेला प्रवासाच्या मागे हेतुसशोधनाचा पोलिसी ससेमिरा असल्यानें प्रवासाचा निर्भर आनंद देशोधडीला लागत असतो.

परंतु वरील सर्व सनातन कौटुंबिक करणांना डावलून मी जेव्हां ' सहज ' ह्या होतकरू निमित्ताचे बोट धरून प्रवासाला जातों म्हणून म्हणालो, तेव्हां तो सर्व प्रकार माझ्या मित्राच्या दृष्टीनें पोरकटपणाचा होत होता. ' सहज ' हे कारण कांहीं पुरेसें पोक्त नाहीं, याची मलाहि जाणीव झाली आणि मी अस्वस्थ झालों. ह्या अस्वस्थपणांत मित्राच्या अधिक लांबट चेहऱ्याच्या अभिनयानें भर पडूं नये म्हणून मी ' सहज ' हे खरें कारण लपवून कुठल्या तरी काल्पनिक खोट्याच कारणाच्या परवलीचा शब्द मित्राच्या तोंडावर फेकला आणि चौकशीच्या चौकींतून पसार झालों. पहिलें खोटें लपविण्याकरितां दुसऱ्यांदां खोटें बोलावें लागतें, ह्याचा अर्थ मी समजूं शकतों. परंतु पहिलें खरें बोललेलेंहि लपविण्याकरितां खोटे बोलण्याचा प्रसंग मजवर आलेला पाहून मी भांबावून गेलों !

माझ्या ‘ सहज ’ प्रवासाला जसे कौटुंबिक कारणांचें पाठबळ नव्हतें, तसाच ‘ केल्यानें देशाटन पंडितमैत्री सभेंत संचार ’ ह्या सुभाषिताचाहि आधार नव्हता ! वास्तविक त्या सुभाषिताचा मुकुट घालून प्रसंगोपात्त मींहि प्रवास केलेला आहे, परंतु त्याहि वेळीं ‘ गड आला पण सिंह गेला ’ ह्या न्यायाने ‘ पंडितमैत्री, सभेंत संचार ’ ह्यांच्या पोशाखी लाभांत देशाटनामुळे येणाऱ्या इतर कांहीं मानवी भावनाच्या प्रत्ययाचा सिंह गमवावा लागत असे. एक वेळ ‘ पंडितमैत्री ’ परवडली, पण नको तो ‘ सभेत संचार ’, असे फार वेळां होत असतें. ‘ पंडितमैत्रीं ’त एकाच इसमाशीं संग असल्यानें पोशाखी आचारविचारांचीं कवचकुंडलें घालून थोड्याच वेळांत स्वतःची सुटका करून घेतां येते. परंतु ‘ सभेत संचार ’ करण्याच्या वेळीं असंख्य लोकांशीं वागतांना धारण कराव्या लागणाऱ्या कृत्रिम हास्याच्या, उथळ चौकशीच्या, अळवावरच्या पाण्याप्रमाणे त्यांच्यांत राहून परस्परांच्या भावनांचा मिलाफ होऊं न देणाऱ्या प्रतिष्ठित अदबीच्या मुखवट्यांनीं माझा जीव अक्षरशः गुदमरून जाई ! ‘ माणूस हा कळप करून राहणारा प्राणी आहे ’ ह्या व्याख्येंतील तोटा तेव्हां मला प्रकर्षानें जाणवत असे. त्या कळपांत वागतांना स्वतःचे आचारविचार हे आत्माविष्काराला न अनुसरतां दुसऱ्याच्या पसंती-नापसंतीच्या इशाऱ्याबरहुकूम होतांना पाहून प्रवासाच्या ‘ पंडितमैत्री ’ इत्यादि फळांइतक्याच दुसऱ्या महत्त्वाच्या लाभाचा दिवसांढवळ्या खून झालेला पहावा लागे. होय, प्रवास करतांना माझ्या अंतश्चक्षूंसमोर दुसराहि एक लाभ असे.

त्या लाभाचा परीस माझ्या मनाला स्पर्शतांच माझ्यावरील औपचारिकपणाचा गंज उडून जात असे. स्वतःच्या गांवांत राहून माझ्या मनावर उपचारांच्या शेंदराचे इतके थर चढलेले असत कीं, मूळची माझी प्रकृति आंत अवघडून बसलेली असे. त्यामुळे रोजच्या आचारविचारांमागची उत्कटता मळूल होई. साहजिकच शुष्क अभिनयावर भागवावे लागे. त्यामुळे गांवांत रस्त्यावरून कधीं दिलखुलासपणे गळा मोकळा करून बोलतां किंवा खळखळून हंसतां येत नव्हते. रस्त्यावरील ओळखीच्या प्रतिष्ठित दृष्टीच्या पहाऱ्यामुळें कुठल्याहि मानवी सौंदर्याकडे डोळे भरून पाहण्याला मी मुकलो होतों. तसेच त्याच ओळखीच्या धूमकेतूच्या धसक्यानें हॉटेलमध्ये शिरतांना सिंहावलोकन आणि दूरदृष्टि ह्यांच्या कुबड्या घ्याव्या लागत असत.

ह्या सर्व बंधनांमुळें स्वतःच्या गांवांत स्वतंत्र असून परतंत्रासारखें वागावे लागत असतें. संवेदनक्षम भावनांचा प्रफुल्लित पुष्पवृक्ष मनांत असून त्याचा आस्वाद न घेतां आल्याने एक प्रकारच्या पोरकेपणाची कळा माझ्यावर पसरते.

आणि म्हणूनच मग मी एके दिवशीं कुठल्या तरी दूरच्या अनोळखी ठिकाणीं प्रवासाला जातों. त्या ठिकाणीं गेल्यावर रामाच्या पदस्पर्शानें शापित अहल्या जिवंत व्हावी, तद्वत् माझ्या शिलावत् झालेल्या अनेकविध भावना फुलारतात. माणूस म्हणून जगण्याच्या संधीने माझें मन हिरवे होतें. त्या अनोळखी ठिकाणीं माझें लौकिक बिरुद—सामाजिक खऱ्या वा खोट्या प्रतिष्ठेचें—गळून पडतें; इतकेंच नव्हे तर या साडेतीन हातांच्या देहाला बाराव्या दिवसापासून

चिकटवलेले नामाभिधानहि निरर्थक ठरतें आणि अक्षरशः पंचमहाभूतांचा पुत्र म्हणून मी तेथे हिंडतो.

ते अनोळखी ठिकाण गर्दीचें शहर असेल तर मी रस्त्यानें रेंगाळत जात जात मानवांचे प्रसाधन पांखराच्या वृत्तीनें टिपून घेतो. घड्याळाच्या पोलिसी हातवाऱ्यांच्या इशाऱ्यावर होणाऱ्या जेवण, झोंप इत्यादि कार्यक्रमांतील कृत्रिमतेची कात टाकतों आणि शरीरधर्माशीं प्रामाणिक राहतो. रस्त्यानें शीळ घालीत हिंडतों. पुरभय्याकडून पाणीपुरी निःसंकोच मनाने खातो. सभोवार गर्दीचें गजबजतें जीवन असूनसुद्धां मी पद्मपत्राप्रमाणें अलिप्त राहून औपचारिकपणाचा स्पर्श होऊं देत नाहीं. किंवा तें अनोळखी ठिकाण निसर्गरम्य असेल, तर त्या निसर्गाच्या नंदनवनांत हिंडतांना मी कधीं सूर्यफूल होऊन सूर्याकडे टक लावून पाहतों, तर कधी अवखळ वारा होऊन वृक्षवेलींना गुदगुदल्या करतों. त्या वेळीं तीं कशीं खळखळून हसतात! कधीं कोकीळ होऊन ‘ तूं कोठें आहेस ? तूं कोठे आहेस ? ’ अशी आर्त अनामिक साद घालतो, तर कधीं बालकवींचा औदुंबर होऊन पाण्यांत पाय सोडून बसतों. कधीं मर्ढेकरांच्या चातक-चोचीने वर्षा-ऋतु पितों, तर कधीं तृणपर्णावर दंवबिंदु होऊन इंद्रधनूचे रंग खुलवीत बसतों. ह्या नाहीं त्या रूपानें मी पुन्हा पंचमहाभूतांच्या अनेकविध स्वरूपांत विलीन होतों.

लहानपणीं शाळेंत जातांना रेंगाळत जायला, रस्त्याच्या बाजूला रंगांत आलेला गारुड्याचा खेळ पहायला सक्त मनाई असे. तेव्हां मी माझी समजूत घालीत असें कीं, शाळेच्या ह्या तुरुंगांतून बाहेर पडल्यावर ह्या विधिनिषेधांच्या सांखळ्या गळून पडतील. परंतु मोठा

झाल्यावर उलट संभावितपणाच्या चौकटींत अडकून बसलों आणि लहानपणाच्या त्या अतृप्त इच्छा तशाच राहिल्या. आणि म्हणूनच मीं मग ही 'सहज' प्रवासाची नवी शाळा शोधून काढली. जुन्या शाळेंत सकल इंद्रियांना पडलेलें कृत्रिम वळण विसरणें एवढेच फक्त नव्या शाळेत शिकायचे होते. नवें मात्र कांहींच शिकायचें नव्हतें. कृष्णमूर्ति म्हणतात त्याप्रमाणे पांखराच्या वृत्तीने, निर्भरतेनें जीवन जगायचें होतें.

* * *

# ज्ञानेश्वरांची मित्रकल्पना

मानवी जीवनांत रक्तसिद्ध नात्यांची जितकी गरज, तितकीच, किंबहुना त्याहूनहि अधिक गरज भावजन्य नात्यांची असते. दुसऱ्यांशीं संबंध जोडणे म्हणजेच जीवन, हें जर त्रिकालाबाधित मूल्य असेल तर माणसाला दुसऱ्याशीं ह्या नाहीं त्या नात्याने स्वतःला जोडून घेतल्याशिवाय जीवन-सार्थकता आणि संपूर्णता लाभत नाहीं.

खरें म्हणजे माणसाच्या जन्माबरोबरच त्याच्या जीवनांत नाते जन्मतें. ‘ सहज ’ रूपांतील ह्या नातेसंबंधांत आई, बाप, भाऊ, बहीण, मावशी इत्यादि अनेकविध भूमिकांतील व्यक्तींशीं तो संबंधित होतो. त्या नात्यांच्या ऊनसावलींत त्याचे भावजीवन तुष्ट आणि पुष्ट होऊं लागतें.

परंतु ह्या सर्व रक्तबद्ध नात्यांची पाठराखण असूनहि मानवाला दुसऱ्याच एका अबोध नात्याची भूक लागते. ह्या अबोध नात्याच्या गरजेची अपरिहार्यता त्याला अगदीं लहानपणापासूनच जाणवत

असते. आणि तो आपल्या समान-वय-गुण-धर्मी व्यक्तींचा शोध करीत असतो. दिवसांतला बराचसा भाग त्यांच्या सहवासांत घालवीत असतो. हा शोध बहुशः समानवयी व्यक्तींमध्यें लागत असला तरी कधीं कधीं वयाचे बंधन गळून पडतें. 'उत्तरराम-चरितां'तील कुमार लवाला प्रौढ रामाच्या प्रथमदर्शनांत हा स्नेहशोध लागतो आणि त्याच्या तोंडून उद्गार बाहेर पडतात कीं —

**आश्वासस्नेहभक्तीनामेकमायतनं महत् ।**
**प्रकृष्टस्येव धर्मस्य प्रसादो मूर्तिसुन्दरः ॥**

एक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीशीं संबंधित होतांना त्या संबंधांत कोणकोणत्या भावनांचे रज्जु असतात, ह्याचा निर्देश करतांना वरील श्लोकांत भवभूतीने स्नेहरज्जूचाहि आवर्जून उल्लेख केला आहे.

वडिलांविषयीं मुलाच्या मनांत आदर, भक्ति ह्या भावना असल्या तरी स्नेहाची भावना निर्माण होण्याची शक्यता फारच कमी. उत्तररामचरितांतील लवाच्या बाबतींत ती निर्माण झाली, ह्याचें कारण पितृविषयक पूर्वसंस्कारांचा अभाव. त्याच्या जीवनांत त्या क्षणापर्यंत प्रभु रामचंद्र वडिलांच्या भूमिकेत कधीं आलेले नव्हते. मुलांच्या मनांत पित्याविषयीं स्नेहाची ही मनमोकळी भावना निर्माण होणें असंभाव्य असल्यानें दुसऱ्या एका साहित्यिकानें ती जबाबदारी

**'प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्'**

असें म्हणून वडिलांवर सोंपविली आहे. याहि ठिकाणीं 'मित्रवत्' असा शब्द योजण्यांत लेखकाला असेंच सुचवायचें आहे कीं, वडिलांना फार तर 'मित्रवत्' होतां येईल. प्रत्यक्ष मित्र होतां

येणार नाहीं. मात्र प्रत्यक्ष मित्र होतां येत नसतांहि ' मित्रवत् ' तरी व्हायला सांगण्यात लेखकानें एक प्रकारें मानवी भावजीवनांतील मित्राचे अपरिहार्यत्वच मान्य केले आहे.

मानवी भावजीवनांत प्रीति आणि भक्ति ह्या भावनांना जें असाधारण स्थान आणि माहात्म्य आहे तेच असाधारण स्थान मैत्रीलाहि आहे, ह्याची उत्कट जाणीव ज्ञानियांच्या राजाला—ज्ञानेश्वरांनाहि होती. नुसती उत्कट जाणीव होती एवढेच नव्हे, तर जीवनांतील सूक्ष्म भावनांचा शोध आणि बोध घेऊन त्यांनीं मित्र-कल्पनेचें तत्त्वज्ञानहि अति रसाळपणे मांडलें आणि नामदेवाशीं मैत्री करून आचरणांतहि आणले. जीवनांत मित्राची गरज कां निर्माण होते ? आई, बाप, भाऊ, बहीण इत्यादि रक्तसिद्ध नाते-वाईक मंडळींत मित्राचे स्थान काय ? त्या मित्रासाठीं माणूस काय काय करण्यास तयार होतो ? इत्यादि मूलभूत समस्यांची उकल ज्ञानेश्वरांनीं श्रीकृष्ण आणि अर्जुन ह्यांच्या एकमेकांतील संबंधाच्या स्वरूपाधारें प्रत्ययकारकतेनें केली आहे. ज्ञानेश्वरींतील श्रीकृष्ण आणि अर्जुन ह्यांच्या संवादांतून एक गोष्ट वारंवार प्रत्ययास येते कीं, ते दोघेहि अशा एका अमर्याद मोकळेपणानें बोलत आहेत कीं, ते मोकळेपणाचें, निःसंकोचपणाचें वर्तन केवळ दोन जिवलग मित्रां-मध्येंच आढळेल. ज्ञानेश्वरांनाहि तो मित्रसंबंधच अभिप्रेत होता. एवढेंच नव्हे तर श्रवणापासून आत्मनिवेदनापर्यंत जी नवविधा भक्ति आहे, त्यांपैकीं आत्मनिवेदनाच्या अलीकडची जी ' सख्य ' नांवाची आठवी भक्ति आहे, त्या ठिकाणची अर्जुन हीच मुळीं मुख्य देवता होती; मैत्रीचें तो घरच होता, असेंहि त्यांनीं स्पष्टपणें म्हटलें आहे.

म्हणऊनि भावार्थु तो ऐसा।
अर्जुन मैत्रियेचा कुवासा।
कीं सुखें शृंगारलिया मानसा।
दर्पणु तो॥

हो का आत्मनिवेदनातळींची।
जे पीठिका होय सख्याची।
पार्थु अधिष्ठात्री तेथींची।
मातृका गा॥

एकूण महाभारतांतच ह्या मैत्रीसंबंधाचे धागेदोरे आढळतात. परंतु श्रीकृष्णाला अर्जुन हा मैत्रीच्याच नात्याने कां हवा होता, ह्याची ज्ञानेश्वरांनीं जी कारणमीमांसा केली आहे, तो मात्र ज्ञानेश्वरांच्या स्वयंभू प्रतिभेचा एक अभिनव विलास आहे. मैत्रीवरील ती एक प्रकारे रसाळ 'घटना' ( Constitution ) आहे. ज्ञानेश्वरींत जीं अनेक हृदयंगम विषयांतरें आहेत, त्यांमध्ये अतिशय रसोत्कट असें हे विषयांतर आहे.

गीतेच्या सहाव्या अध्यायांतील 'योगी युंजीत सततम्.... ' ह्या दहाव्या श्लोकावर टीका करतांना साधूंचीं लक्षणें सांगून झाल्यावर ज्ञानेश्वरमहाराज अतिशय सहजतेनें तीं सर्व लक्षणें ज्याच्या अंगीं प्राथम्यानें आणि प्रकर्षानें वास करतात, त्या श्रीकृष्णपरमात्म्याविषयीं गाहिंवरून येऊन बोलूं लागतात. हें विषयांतर चालू असतांनाच आपणांस त्याचा यत्किंचितहि सुगावा लागूं नये, ह्या आविर्भावांत ज्ञानेश्वर म्हणतात कीं, श्रीकृष्णांनीं अर्जुनाला ब्रह्मविद्या उघड उघड कां सांगितली नाहीं? साधूंचीं लक्षणे सांगण्याची आडवाट कां पत्करली? अर्जुनाला आत्मज्ञान करवून देऊन स्वरूपांत विलीन करण्याचें कां टाळलें? ह्या प्रश्नांचीं उत्तरेंहि ज्ञानेश्वरमहाराजच देतात.

आणि तीं उत्तरें तार्किक पातळीवरून रुक्षपणें न देतां ज्ञानेश्वर मानवी भावनांचा मागोवा घेत तुमच्या-आमच्या मूक भावनिक गरजांना वाचा फोडतात. तुम्हां-आम्हांला मित्राची गरज कोणकोणत्या क्षणीं भासते ? आपल्या जीवनांतहि कधीं कधीं आत्माविष्काराची गरज निर्माण होते. कांहीं दिव्य आनंदाने मन भरून येते. त्या आनंदांत दुसऱ्याला सहभागी करून घेतल्याशिवाय त्या आनंदाला जणुं कांहीं पूर्णत्वच येऊं शकत नाहीं. म्हणूनच कुणाशीं तरी तोंड भरून बोलावेंसें वाटतें. आणि 'तो कुणी तरी' कसा हवा ? तर ज्याच्याकडे पाहून दृष्टि निवावी, ज्याला आलिंगन द्यावेंसें वाटावें, ज्याच्या अभावीं जीवनांत एकट्याने जगायचें तरी कशाला, असा प्रश्न निर्माण व्हावा. असा प्रश्न निर्माण होऊं नये म्हणूनच वरील सर्व गरजा भागविणारा मित्र आपल्या आयुष्यांत अपरिहार्य स्थान मिळवून बसतो. ज्ञानेश्वरांच्या मतें श्रीकृष्णाच्या जीवनांत अर्जुनाला 'त्या मित्राचे' स्थान लाभलें होतें. म्हणूनच श्रीकृष्ण त्याला ब्रह्मज्ञान उघड करीत नाहींत. एक पातळसा आडपडदा शिल्लक ठेवतात. कारण—

> विपार्ये अहंभाव ययाचा जाईल ।
> मी तेंचि हा जरि होईल ।
> तरि मग काय कीजेल ।
> एकलेया ।।
>
> दिठीचि पाहतां निविजे ।
> कां तोंड भरोनि बोलिजे ।
> नातरी दाटूनि खेंव दीजे ।
> ऐसें कवण आहे ।।

**आपुलिया मना बरवी ।**
**असमाई गोठी जीवि ।**
**ते कवणेसी चावळावी ।**
**जरी ऐक्य जाहलें ॥**

असा मित्र आयुष्यांत लाभला म्हणजे मग त्याच्या प्रेयस्कारक तथा श्रेयस्कर गोष्टींसाठीं कायावाचामने कष्ट उपसण्यांत श्रम न होतां अंगावर मूठभर मांस चढल्याचे समाधान होते. ह्या समाधानाचीं प्रसादचिन्हे ज्ञानेश्वरांना श्रीकृष्ण-पांडवांच्या सहवासांत ठायीं ठायीं आढळलीं. एखादा मुलगा स्वतःच्या घरीं कदाचित् काम करणार नाहीं. परंतु मित्राच्या घरीं मात्र तो जमीन झाडण्यासहि मागेंपुढें पाहणार नाहीं. ह्या मैत्रीच्या दिव्य स्पर्शाने श्रीकृष्ण पांडवांघरीं अंतर्बाह्य बदलून जात असे. म्हणूनच पांडवांच्या घरीं राजसूय यज्ञांत उष्ट्या पत्रावळी उचलण्यांत त्याला लाज वाटली नाहीं ; घोड्यांना खरारा करण्यांत त्याने कमीपणा मानला नाहीं. आपल्या आवडत्या अर्जुनासाठीं सुभद्राहरणाचा डाव तर त्यानें यशस्वी केलाच, परंतु मित्रपुत्र अभिमन्यूसाठीं मायाबाजार निर्मून वत्सलाहरणाहि घडवून आणले. इतकेच नव्हे तर आपल्या प्रिय अर्जुनाच्या प्राणरक्षणाकरितां प्रसंगीं त्यानें ' न धरीं शस्त्र करीं मी.... ' ही प्रतिज्ञासुद्धां झुगारून देऊन हातीं शस्त्र धारण केलें.

महाभारतांतील ह्या अनेकविध प्रसंगांतील सूक्ष्म सौदर्यानें ज्ञानेश्वरांना स्पर्श केला. त्यांना त्या सर्व प्रसंगांतून श्रीकृष्ण-अर्जुन मैत्रीचेंच उत्कट दर्शन घडलें. आणि म्हणूनच त्यांनीं अर्जुनाला भक्तीच्या इतर प्रकारांत न घालतां त्याला ' मैत्रियेचा कुवासा ' ही पदवी दिली.

ज्ञानेश्वरांनीं गीतेच्या ज्या अनेक भागांवर आपला प्रतिभाप्रकाश टाकून त्यांतील सुप्त सौंदर्याचे आल्हाददायक दर्शन घडविलें, त्यांपैकीं श्रीकृष्ण-अर्जुन संबंध हा एक हृद्य भाग होय. त्यांना अर्जुनाला लाभलेले हे मित्र होण्याचे भाग्य परम वाटतें. मित्र होण्याचें हे भाग्य ज्याला लाभलें, त्याला नातेवाइकांपेक्षां जास्त महत्त्व कसे येते, हेहि ज्ञानेश्वरांनीं रसाळपणे वर्णिले आहे. म्हणूनच ते म्हणतात :

**देवकी उदरीं वाहिला ।**
**यशोदा सायासें पाळिला ।**
**शेखीं उपेगा गेला ।**
**पांडवांसीं ॥**

**किंबहुना बहुदिवस ओळगावा ।**
**किं अवसरू पाहोनि विनवावा ।**
**हाहि सोसु तया सदैवा ।**
**पडोचि ना ॥**

पतिला पत्नी कितीहि प्रिय असली तरी तिलाहि आपल्या ईप्सिता-साठीं पतीचा कल हेरावा लागतो. परंतु अर्जुन मित्र झाल्यानें त्याला तें पथ्यहि पाळण्याचें कधीं कारण पडलें नाहीं. ज्ञानेश्वरींत ह्या ‘ मित्रवर्या ’नें किती तरी वेळां उतावळेपणाने श्रीकृष्णाला शंकाकुशंका विचारल्या आहेत. परंतु ‘ काय हें उच्छृंखल बोलणे ’ एवढेंच हंसून बोलून श्रीकृष्ण त्याचे यथास्थित समाधान करतो. ह्या मित्रप्रेमामुळेच युद्ध-क्षेत्रासारख्या अशान्त स्थानीं अर्जुनाला गीतोपदेशाचा निवान्त समयीं करावयाचा वेदान्त सांगावयाला श्रीकृष्णाला वावगें वाटत नाहीं ; लोक काय म्हणतील ह्याचा विचार पडला नाहीं. कारण ज्ञानेश्वरांच्या

मतें मित्राला सहाय्य करण्याचे ठरल्यावर ह्या लौकिक लाजलज्जेच्या बाबी अप्रस्तुत ठरतात. कारण—

पाहा पां नवल कैसें चोज ।
कें उपदेश केउतें झुंज ।
परि पुढें वालभाचें भोज ।
नाचत असे ॥

आवडी आणि लाजवी ।
व्यसन आणि शिणवी ।
पिसें आणि न भुलवी ।
तरी तें काई ॥

* * *

# अपवादाचा बोधिवृक्ष

रूढार्थातील शालेय जीवन जेव्हां संपलें, तेव्हां झालेल्या दु:खांत अभ्यासांतील कांहीं किचकट गोष्टींच्या कचाट्यांतून सुटल्याबद्दलचा एक सूक्ष्म आनंदहि होता.

त्या अनेक किचकट गोष्टींत जशीं नदीकांठावरील गांवें होतीं, कुप्रसिद्ध लढायांचे सन होते, तशींच किंबहुना अधिक त्रासदायक होतीं तीं व्याकरणांतील अपवादाचीं उदाहरणें.

शाळेंत असतांना व्याकरणाचे नियम पाठ करीत यावें न यावें, तोंच अपवादाच्या उपटसुंभाचा आदरसत्कार करण्याची आपत्ति येऊन कोसळत असे. बरें तीं केव्हां, कशीं आणि कोठें उगवतील, याला कांहींच धरबंद नसल्यानें, त्यांच्या त्या गनिमी काव्यानें मी तेव्हां अक्षरश: मेटाकुटीस येत असे. मुख्य सैन्यापेक्षां बाजार-बुणग्यांना सांभाळणें जसें सेनापतीच्या जिवावर यावें, तसें मला गलथानपणे वावरणाऱ्या अपवादांची व्यवस्था ठेवतांना त्राहि भगवन्

होत असे. नियमांच्या सर्व-संग्राहक तंबूतून बाहेर पडून स्वतःची स्वतंत्र राहुटी ठोकणाऱ्या त्या अपवादांची नोंद करतांना मी फारच गोंधळ करीत असें. त्या अपवादांनीं स्वतःचें इतकें स्तोम माजवून ठेवले होतें कीं, बिचाऱ्या नियमांचे अस्तित्व त्या अपवादांकरितांच आहे कीं काय, इथपर्यंत मजल आली होती. आणि म्हणूनच 'अपवादांनीं नियम सिद्ध होतो' अशी सनदहि त्या अपवादांना मिळाली होती. 'नाकापेक्षां मोती जड' अशा त्या अपवादांवर म्हणूनच माझें मन नेहमीं रुष्ट असे.

परंतु शाळेंतले व्याकरण जाऊन जेव्हां प्रत्यक्ष जीवनाच्या व्याकरणाचें विश्वरूप-दर्शन घडले, तेव्हां मीं स्वतःच अपवादाचें निशाण उभारले! दुधाच्या हंड्यांतील मिठाच्या खड्याप्रमाणें वाटणारा व्याकरणांतील अपवाद जीवनांत मात्र रूढ नीतिनियमांच्या सांवटांतील प्रकाशस्थळाप्रमाणे वाटला. व्याकरणांतील अपवादांची दृष्टि चुकविणारा मी आतां जीवनांत मात्र अपवादाचीच कांस धरूं लागलों.

ह्या नव्यानें झालेल्या अपवादाच्या साक्षात्कारानेंच माझ्या अंगीं एक नवें सामर्थ्य आणले. पारंपरिक पुनरावृत्तीच्या धसक्यानें मरगळलेल्या माझ्या वृत्तींतून जीवनरस खळखळून वाहूं लागला. मनीं योजलेल्या आकांक्षेचीं शिडें तरारून उभीं राहिलीं. त्या नव्या अपवाद-प्रकाशांत सुखाची माधुरी 'कलात्मक अलिप्ततेनें' चाखली आणि दुःखांची कटुता क्रीडापटूच्या खेळकरपणानें हंसत झेलली. जीवनांतील समस्यांना सगेसोयऱ्यांनीं सांगितलेलीं लब्ध-प्रतिष्ठित परंतु कागदी उत्तरें न देतां त्या समस्यांना अनुभवाच्या

क्षेत्रांत रुजवून चिंतनमननाचें खतपाणी घातलें. तेव्हां कुठें त्या समस्यांना रसरसलेल्या जिवंत उत्तराचीं फुले येऊं लागलीं.

मला तर वाटतें, माणसाच्या ऐहिक व पारलौकिक जीवनांतील दुर्लभ साध्ये केवळ ह्या अपवादाच्या साक्षात्कारानेंच दृष्टिपथांत येतात आणि कालांतरानें आत्मसात् होतात. अपवादाच्या साक्षात्काराची वैजयंतीमाळ आपल्या गळ्यांत पडावी, अशी प्रच्छन्न आशा प्रत्येकालाच असते. मात्र अपवादाचें जीवन ही एक तपस्या असल्यानें त्याचें फळ रूढ नीतिनियमांच्या शाळेंतील मासिक पगाराप्रमाणें महिन्याच्या एक तारखेला मिळत नाहीं. परंतु ज्या क्षणीं तो आपल्या शिरपेंचांत अपवादाचा तुरा खोवतो, त्या वेळेपासूनच त्याच्या सुख-दुःखाचे अर्थ बदलतात.

असा हा अपवादवादी माणूस व्यक्ति-स्वातंत्र्यवादी असतो, व्यक्तिवैशिष्ट्यवादी असतो. नियमांचा पूर्वग्रहदूषित चष्मा डोळ्यांवर नसल्यानें तो दुसऱ्याच्या जीवनाकडे समजूतदारपणें पाहतो. मला तर असें वाटतें कीं, प्रत्येक अपवादवादी माणूस हा अध्यात्मवादी असतो आणि म्हणूनच अध्यात्मक्षेत्राप्रमाणेंच अपवादवाद्यांच्या विश्वांत 'पुढच्यास ठेंच मागचा शहाणा' ह्या नियमांतील परोपजीवी वृत्तीस स्थान नसतें. तेथें प्रत्येकास स्वतंत्र रीत्या अनुभव घ्यावा लागतो; इतकेंच नव्हे तर त्या अनुभवांतील प्रत्येक दिवस हा नित्य नवा असतो. जो 'आत्मप्रभा नीच नवी। तेचि करूनि ठाणदिवी।' वागेल त्यालाच आत्मज्ञानाचा लाभ घडतो, असें जें ज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे, तें म्हणणेंच मुळीं अपवादवादी जीवनाचें मूल्य असतें.

ह्या अपवादाच्या साक्षात्कारामुळेच प्रेमकवींचा कधीं अस्त होत नाहीं, होणार नाहीं. प्रत्येक प्रेमकवीला आपली प्रीतिविषयक अनुभूति ही अपवादभूत वाटत असते. म्हणूनच तो त्या अनुभूतीला काव्यरूप देण्याचा प्रयत्न करतो. मला तर वाटते कीं, प्रत्येक कलावंताच्या जीवनाची सुरवातच मुळीं अपवादाच्या साक्षात्कार-बिंदूपासून होते. एका डॉक्टरसारखा दुसरा डॉक्टर होऊं शकतो म्हणून डॉक्टरकीच्या शाळा निघूं शकतात. परंतु कलावतांनीं मात्र शाळेचे हे सांवट स्वप्नांतदेखील पाहिलेले नसते. एका कलावंता-पेक्षां दुसरा कलावत भिन्न असतो, याचे कारण प्रत्येकाच्या हृदयां-तील अपवादाचा साक्षात्कार !

ज्या प्रमाणांत ह्या अपवादाच्या साक्षात्काराची तीव्रता कमी-अधिक असेल, त्या प्रमाणांत तो माणूस रसरसलेले जीवन जगून जातो. कधीं कधीं तुकोबासारख्या माणसांना हा साक्षात्कार ' एका-एकीं आतां तुका । लौकिका या बाहेरी ॥ ' असे जाणवून होतो, तर कधीं कधीं त्या अपवादाचे सम्यक् दर्शन न झाल्याने कुणी अर्ध्या रस्त्यावरूनच परत फिरतात. अपवादाच्या साक्षात्काराशीं नुकतीच ओळख पटूं लागलेल्या, वसत बापटांच्या कवितेतील नायकाला अशा वेळीं, तपाचरण करणाऱ्या मुनीला इंद्राच्या अप्सरांनीं परावृत्त करावें त्याप्रमाणे—

> **' सगेसोयरे सांगति तेव्हां व्यवहाराची रीत**
> **कोणि म्हणाले परत मागुती प्रीत असे विपरीत. '**

आणि तोहि बिचारा अनवधानाने परत फिरतो आणि मग आयुष्यभर ' सुखसंसारीं ' रडत बसतो.

मला तर असे वाटते कीं, ‘अपवाद’ हाच सृष्टिक्रमाचा स्थायीभाव आहे. म्हणूनच एका सूर्योदयासारखा दुसरा सूर्योदय नसतो. प्रत्येकाचे सौंदर्य हे व्यवच्छेदक असते. नेमेचि येणारा पावसाळा प्रत्येक वर्षी वेगळा असतो म्हणूनच त्याच्या सौंदर्याची नित्य नवी मोहिनी पडत असते. ऑक्टोबरांतील सायंकाळचे मेघाकृतीं-वरील रंगसौंदर्य प्रत्येक दिवशीं नवनवोन्मेषशाली असतें, म्हणूनच त्याच्या दर्शनासाठीं बदामी डोळे रोजच आतुर होतात. ह्याच अर्थाने एका माणसासारखा दुसरा माणूस वाच्यार्थाने असला तरी लक्ष्यार्थाने कधींहि नसतो आणि म्हणून एकाला दुसऱ्याच्या जीवना-विषयीं कुतूहल वाटते. त्या कुतूहलापोटींच तीं एकमेकांना समजून घेतात. तेवढ्यासाठींच समाज बनतो. परंतु तो एकखांबी तंबूसारखा नव्हे, तर अनेकविध स्वतंत्र राहुट्यांचा !

* * *

कलावंताला शैशवावांचून दुसरें वय नसते. तुमच्या-आमच्या जरठ जीवनात तो शैशवदूत होऊन येतो आणि आपल्या शैशवदृष्टीनें जीवनातील सौंदर्याचीं पुष्पें वेंचतो, तीं कलेच्या सूत्रात माळतो आणि अव्याज स्नेहानें रसिकांना सादर करतो. श्री. **देवीदास बागूल** यांच्या '**शैशवदूत**' या ललितनिबंध-संग्रहांत कलाकाराची हीच शैशव-वृत्ति उत्कटतेनें प्रकटली आहे.